॥ श्री ॥

# महाराष्ट्र भामिनीविलास.

लक्ष्मण गणेशशास्त्री लेले,

यांनीं रचिला.





शके १८२५.

किंमत बारा आणे.

॥ श्रीः ॥

# महाराष्ट्र भामिनीविलास

अथवा

## पण्डितजगन्नाथरायकृतभामिनीविलासाचें मराठी पद्यात्मक भाषान्तर.

हा ग्रंथ

लक्ष्मण गणेशशास्त्री लेले

नासिककर

मेघदूतकाव्याचें समवृत्त मराठी भाषांतर, पद्यमंजरी, पद्यमंजूषा, इ० काव्यांचे कर्ते,

यांनीं रचिला.

तो

पुणें येथें

आर्यभूषण छापखान्यांत छापिला.



सन १९०३.



किंमत बारा आणे.

## मंगल.

विधिचिया नियमा अवमानिते
सहृदयान्तरिं मोदाचि निर्मिते ।
नवरसीं नटली रुचिराकृती
जनिं अशी मिरवे कविभारती ! ॥१॥

## साधुवन्दन.

पराचें साधाया हित निजहितातें दवडिती
अभेदाची दृष्टी धरुनि सकलां तुल्य गणिती ।
स्वभावें औदार्यप्रभृति गुण ज्यांचे विकसती
विभूती त्या, लोकीं अतुल निजतेजें विलसती ॥२॥

## जगन्नाथप्रशंसा.

जयाचे आलाप श्रवणिं पडतां फार मधुर
न वाग्देवी प्रेमें फिरवि निजवीणेवरि कर ।
कवीन्द्राच्या ऐशा ललितवचनांनीं न डुलती
जनां त्या मानावें मनुजपशु किंवा पशुपति ॥३॥

## गुरुनामादिसंकीर्तन व अर्पण.

ज्याचा तात असे गणेश सुकृती, माता यशोदा सती
लेले हें कुल, नाम लक्ष्मण, जनस्थानीं जयाची स्थिती ।
त्यानें पद्यमयी नवीन रचिली भामाविलासावरी
छाया प्राकृत; ती करो सहृदयस्वान्तातपातें दुरी ॥४॥

# प्रस्तावना.



जगन्नाथरायपंडित या कवीचें नांव ठाऊक नाहीं असा संस्कृतज्ञ मनुष्य विरळा. त्यानें रचिलेला भामिनीविलासनामक सुंदर आणि विद्वन्मान्य ग्रंथ सुप्रसिद्ध आहे. प्रस्तुत पुस्तक हें त्याचें मराठी पद्यात्मक भाषान्तर आहे; ह्मणून त्याला महाराष्ट्र भामिनीविलास हें नांव दिलें आहे.

जगन्नाथाच्या कित्येक ग्रंथांत त्यानें आपणाविषयीं कोठें कोठें उल्लेख केला आहे त्यावरून त्याच्यासंबंधानें थोडीशी विश्वसनीय माहिती उपलब्ध होते. ती अशीः—

जगन्नाथ हा तैलंग[1]कुलोत्पन्न ब्राह्मण होय. याच्या वडिलांचें नांव पेरुभट्ट[2] असें होतें. यांना पेरमभट्ट[3] असेंही ह्मणत. हे मोठे पण्डित होते. यांनीं काशीमध्यें[4] अध्ययन केलें. हे ज्ञानेन्द्र[5]स्वामीजवळ वेदान्त शिकले; महेन्द्र[6]पण्डितांपासून यांनीं न्यायवैशेषिकदर्शनें संपादन केलीं; [7]खण्डदेवांनीं यांच्यावर पूर्वमीमांसेचा अनुग्रह केला; आणि शेषोप[8]नामक पंडितांनीं त्यांस महाभाष्य सांगितलें.

---

१ तैलंगान्वयमङ्गलालयमहालक्ष्मीदयालालितः । ( प्राणाभरण ); तैलंङ्गकुलावतंसेन पंडितजगन्नाथिनासफविलासाख्येयमाख्यायिका निरमीयत । सेयमनुग्रहेण सहृदयानामनुदिनमुल्लासिता भवतात् ( आसफविलास ). २ पाषाणादपि पीयूषं स्यन्दते यस्य लीलया ॥ तं वन्दे पेरुभट्टाख्यं लक्ष्मीकान्तं महागुरुम् ॥ (रसगंगाधर ). ३ श्रीमत्पेरमभट्टसूनुरनिशं विद्वल्ललाटंतपः । ( प्राणाभरण ). ४ अध्यगीष्ट स्मरहरनगरे ( रसगंगाधर ). ५ श्रीमज्ज्ञानेन्द्रभिक्षोरधिगतसकलब्रह्मविद्याप्रपञ्चः । ( रसगंगाधर ). ६ काणादीरक्षपादीरपि गहनगिरो यो महेन्द्रादवेदीत् । ( रसगंगाधर ). ७ देवादेवाध्यगीष्ट स्मरहरनगरे शासनं जैमिनीयम् । ( रसगंगाधर ). ८ शेषाङ्कप्राप्तशेषामलभणितिरभूत् । ( रसगंगाधर ).

पेरुभट्टांच्या कुटुंबाचें नांव लक्ष्मी असें होतें. तिच्यापासून त्यांना एक पुत्र झाला. त्याचें नांव जगन्नाथ. हाच पुढें जगन्नाथराय-पंडित या नांवानें प्रसिद्धीस आला. यानें सर्व शास्त्रांचा अभ्यास प्रायः आपल्या वडिलांजवळ केला[2]. तरुणपणीं त्याचा दिल्लीदरबा-रांत प्रवेश होऊन त्याचें तारुण्य सगळें तेथेंच गेलें[3]. असामान्य विद्वत्ता, कुशाग्र बुद्धि, प्रशंसनीय व्यवहारचातुर्य, विलक्षण सभापाण्डित्य आणि सरस कवित्व या गुणांनीं जगन्नाथराव शहाजहान बादशहा प्रसन्न होऊन त्यानें जगन्नाथाला सन्मानार्थ पंडितराय ही पदवी दिली[4]. उत्तरवयांत जगन्नाथ काशी किंवा मथुरा येथें असावा असें दिसतें.

शहाजहान बादशाहानें आपणास पंडितराज ही पदवी दिली, असें जगन्नाथानें आपल्यां आसफविलासग्रंथांत लिहून ठेविलें आहे; त्यावरून तो सदर बादशाहाच्या कारकीर्दीत होता यांत संशय नाहीं. याला दुसऱ्याही कांहीं गोष्टी पोषक आहेत. त्या एणें-प्रमाणें:—अबुलफझलकृत ऐन-ई-अकबरी या ग्रंथाच्या ग्लॅडविन्-

१ तं वन्दे पेरुभट्टाख्यं लक्ष्मीकान्तम् । (रसगंगाधर). तैलंगान्वयमङ्गला-लयमहालक्ष्मीदयालालितः । (प्राणाभरण). २ सा च प्रक्रियाप्रकाशकृतां पौत्रैरखिलशास्त्रमहार्णवमन्थाचला- (य) मानसा (ना) मस्मद्गुरुप-ण्डितवीरेश्वराणां तनयै र्दूषिताऽपि स्वमतपरीक्षार्थं पुनरस्माभि र्निरीक्ष्यते । (मनोरमाकुचमर्दन). यावरून पंडितवीरेश्वर यांच्याजवळही जगन्नाथानें अध्ययन केलें असें दिसतें. ३ दिल्लीवल्लभपाणिपल्लवतले नीतं नवीनं वयः । (भामिनीविलास). ४ सार्वभौमश्रीशहाजहांप्रसादादधिगतपण्डितराज-पदवीविराजितेन तैलंगकुलावतंसेन पंडितजगन्नाथेनासफविलासाख्येय-माख्यायिका निरमीयत (आसफविलास). ५ संप्रत्यंधकशासनस्य नगरे तत्वं परं चिन्त्यते. (भामिनीविलास). याचेंच पाठान्तर आहे तें असें:— संप्रत्युज्झितवासनं मधुपुरीमध्ये हरिः सेव्यते । अंधकशासननगर म्हणजे काशी आणि मधुपुरी म्हणजे मथुरा.

साहेबांनीं केलेल्या इंग्रजी भाषांतरामध्यें शहाजहान यानें जगन्नाथ यास पंडितराज ही पदवी दिली असें लिहिलें असल्याचें समजतें. जगन्नाथपंडित व अप्पयदीक्षित यांची काशी येथें गांठ पडली होती अशाविषयीं आख्यायिका आहे[१]; आणि अप्पयदीक्षित व रामदास यांची कावेरी नदीच्या तीरीं आडवळें गांवीं इ. स. १६५५ सालीं भेट झाली असें काव्येतिहाससंग्रहांत आढळतें. वामनपंडित यांनीं जगन्नाथकृत गंगालहरीस्तोत्राचें मराठींत समश्लोकी भाषान्तर केलें आहे. या स्तोत्राची पुष्कळ दिवस प्रसिद्धि व मान्यता असल्याशिवाय वामनासारख्या पंडितानें त्यास भाषांतराचा मान दिला असेल असें वाटत नाहीं. वामनपंडित इ. स. १६७३ सालीं वांईजवळ पांडववाडी येथें निवर्तले[२]. रामदास, वामनपंडित, आणि तुकाराम शिवाजीमहाराजांच्या वेळेस होते हें इतिहासांत नमूद आहे. शिवाजीमहाराजांचें पूर्ववय शहाजहानाच्या कारकीर्दींत आणि उत्तरवय औरंगजेबाच्या अमदानींत गेलें.

जगन्नाथाविषयीं कांहीं आख्यायिका प्रचलित आहेत. या ग्रंथाच्या शेवटीं जोडलेल्या तिसऱ्या परिशिष्टांत जगन्नाथाचें चरित्र दिलें आहे त्यांत त्याच्या संबंधाच्या आख्यायिका आल्या आहेत. सदर आख्यायिकांत तो अकबराच्या कारकीर्दींत होता असें आहे. अकबर याची कारकीर्द इ. स. १५५६ पासून इ. स. १६०५ पर्यंत झाली. प्रसिद्ध वैयाकरणकेसरी भट्टोजिदीक्षित हे इ. स. १५७८ सालीं जन्मले[३]. भट्टोजिदीक्षित आणि अप्पयदीक्षित यांचा परमस्नेह असून भट्टोजिदीक्षितांनीं सिद्धान्तकौमुदी, प्रौढमनोरमा, वैयाकरणभूषण, शब्दकौस्तुभ इत्यादि स्वकृत ग्रंथांची आपल्या शिष्यप्रशिष्यमंडळींत व अन्यत्रही

१ तिसरें परिशिष्ट पहा. २ कविचरित्र. ३ कविचरित्र.

प्रसिद्धि व प्रसार करण्याविषयीं अप्पयदीक्षितांस प्रेमपूर्वक विनंति केली होती.[1] जगन्नाथपंडित आणि अप्पयदीक्षित यांची काशी येथें गांठ पडल्याचा मागें उल्लेख केला आहे. शेषोपाव्ह श्रीकृष्णपंडित हे भट्टोजिदीक्षितांचे गुरु. त्या पंडितांचे चिरंजीव वीरेश्वरपंडित. हे जगन्नाथाचे गुरु होते. तेव्हां जगन्नाथ हा दीक्षितांच्या बरोबरचा किंवा थोडा धाकटा असावा असें दिसतें. यावरून जगन्नाथ आपल्या पंचविशीच्या सुमाराला अकबराच्या कारकीर्दींत असण्याचा संभव आहे. जगन्नाथाचें वय भट्टोजिदीक्षितांच्या बरोबरीचें होतें, आणि तो इ. स. १६५८ सालापर्यंत वांचला अशी कल्पना केली तर त्याचें वय मरणसमयीं ऐंशी वर्षांचें होतें असें होईल; आणि इतके दिवस वांचणें मुळींच असंभवनीय नाहीं. जगन्नाथाची ऐंशी वर्षांची आयुर्मर्यादा गृहीत धरली तर त्याची यौवनावस्था अकबराच्या कारकीर्दींत येते; मध्य वय जहांगिराच्या अमदानींत जातें; आणि वार्धक्य शहाजहानाच्या काळाशीं सुसंगत होतें. अकबराच्या लवंगी नांवाच्या तरुण कन्येच्या समागमांत पंडितांचें तारुण्य जाणें, व परिणतवयांत विद्येचा परिपाक झाल्यावर त्यास शहाजहानाकडून पंडितराय ही पदवी मिळणें यांत कांहीं विसंगतपणा नाहीं एवढेंच नव्हे, तर एक प्रकारें अनुरूपताही आहे. तेव्हां अकबर, जहांगीर आणि शहाजहान या तिघांच्याही कारकीर्दींत जगन्नाथ होता असें मानण्यास कांहीं हरकत नाहीं.

भट्टोजिदीक्षित, अप्पयदीक्षित आणि जगन्नाथ हे तिघेही महापण्डित असून एकाच वेळेला होते असें दिसतें. दक्षिणेंत रामदास, तुकाराम, वामनपण्डित हे स्थूलमानानें जगन्नाथाचे सम-

---

१ कविचरित्र. २ रसगंगाधर; पृष्ठ ६ वें. ३ तिसरें परिशिष्ट पहा.

कालीन होते असें वर दिलेल्या हकीकतीवरून लक्ष्यांत येईल. भट्टोजिदीक्षित आणि अप्पयदीक्षित यांच्याशीं जगन्नाथाचा विरोध होता असें दिसतें. कारण भट्टोजिदीक्षितकृत मनोरमा-ग्रंथावर मनोरमाकुचमर्दन नांवाचा एक टीकाग्रंथ जगन्नाथानें केला. त्या ग्रंथांत त्यानें भट्टोजिदीक्षितांचें अनेक ठिकाणीं खण्डन केलें. अप्पयदीक्षित यांच्या चित्रमीमांसानामक ग्रंथावर जगन्नाथानें चित्रमीमांसाखंडन या नांवाचा ग्रंथ लिहिला. यांत त्यानें दीक्षितांचे दोष अनेक स्थलीं व्यक्त केले. शिवाय रसगंगाधरग्रंथांतही जगन्नाथानें अप्पयदीक्षितांचीं मतें तिरस्कारपूर्वक खोडून टाकिलीं. अप्पयदीक्षित अत्यंत धर्मनिष्ठ व कर्मठ होते; व जगन्नाथ आचारभ्रष्ट होता; शिवाय जगन्नाथाला यवनीसंसर्गदोषासंबंधानें बहिष्कार घालण्यांत काशीक्षेत्रांतील ब्रह्मवृंदामध्यें अप्पयदीक्षित पुढारी होते. या कारणामुळें जगन्नाथानें रागावून त्या पण्डिताचा आपल्या ग्रंथांत अनेक स्थलीं अधिक्षेप केला असें कित्येक जुन्या विद्वानांच्या तोंडून आह्मीं ऐकलें आहे. अप्पयदीक्षितांचे वेदान्त, अलंकार, न्याय, धर्म इत्यादि शास्त्रीय विषयांवर अनेक ग्रंथ आहेत. त्यांत कुवलयानंद आणि चित्रमीमांसा हे दोन अलंकारग्रंथ विशेष प्रचलित आहेत. दीक्षितांचें वय मृत्युसमयीं नव्वद वर्षांचें होतें.[1]

रसगंगाधर[2], मनोरमाकुचमर्दन[3], आणि चित्रमीमांसाखण्डन[4] या ग्रंथांमध्यें जगन्नाथाची सूक्ष्म व विशद बुद्धि, प्रतिपक्षा-

---

१ कविचरित्र. २ हा साहित्यावरचा विद्वन्मान्य ग्रंथ आहे. ३ भट्टोजिदीक्षितकृत मनोरमेचें यांत खण्डन केलें आहे. ४ अप्पयदीक्षितकृत चित्रमीमांसा नामक एक अलंकारग्रंथ आहे, त्यांतले दोष यांत दाखविले आहेत.

वर कोटि करण्याचें चातुर्य, आणि पांडित्य हीं उत्कृष्टपणें व्यक्त झालीं आहेत.

गंगालहरी[1], सुधालहरी[2], करुणालहरी[3], अमृतलहरी[4], लक्ष्मीलहरी[5], भामिनीविलास, आसफविलास[6], जगदाभरण[7], प्राणाभरण[8], यमुनावर्णन[9] इत्यादि ग्रंथांत सहृदयाला आल्हाद देणारी अशी जगन्नाथाची रमणीय काव्यस्फूर्ति विशेषतः गोचर होते. प्रस्तुत कवींची वाणी प्रौढ, सरळ, मधुर आणि सतेज आहे. तो उत्तम[10] काव्याचें मर्म जाणणारा आणि उत्तम काव्याचा कर्ताही होता यांत संशय नाहीं. तथापि त्याचें चित्रकाव्यावरही[11] पराकाष्ठेचें प्रेम होतें, ही गोष्ट त्याच्या कोणत्याही दहा पांच कविता वाचून देखील लक्षांत येण्यासारखी आहे. प्राचीन महर्षि व्यासवाल्मीकि, किंवा त्यांच्या मानानें अर्वाचीन कालिदासभवभूत्यादि सरस्वतीचे कण्ठमणि यांच्या लोकोत्तर वाणीशीं पंडितांची वाणी तोलूं शकत नाहीं हें खरें; तथापि गेल्या पांच चार शतकांत जे संस्कृत कवि झाले त्यांच्या मालिकेंत पंडितांना अग्रेसरत्वाचा मान आहे यांत संशय नाहीं.

भामिनीविलास हा ग्रंथ पद्यात्मक आहे. यांतील अनेक पद्यें

---

१ हें भागीरथीचें बावन पद्यांचें स्तोत्र प्रसिद्ध आहे. याला पीयूषलहरी असेंही नांव आहे. २ सूर्यस्तवरूप काव्य. ३ विष्णुस्तुतिरूप काव्य. ४ यमुनास्तुतिरूप काव्य. ५ लक्ष्मीचें स्तोत्र आहे. ६ नबाब आसफखाननामक कोणा मुसलमान सरदाराचें यांत वर्णन आहे. हा ग्रंथ संपूर्ण उपलब्ध नाहीं. ७ शहाजहानाचा मुलगा दाराशाह याची यांत स्तुति आहे. ८ कामरूप देशाचा राजा प्राणनारायण याचें यांत वर्णन आहे. ९ हा गद्यग्रंथ उपलब्ध नाहीं. १० ध्वनिकाव्य. ११ शब्दचमत्कारप्रधान काव्य.

रसगंगाधरग्रंथांत उदाहरणार्थ घेतलेलीं आढळतात. एकंदरींत सगळे श्लोक प्रसंगाप्रसंगानें रचलेले असून त्या सर्वांचा संग्रह प्रस्तुत पुस्तकांत केला आहे असें दिसतें. एका पद्याचा दुसऱ्या पद्याशीं संबंध नसल्यामुळें तीं पद्यें इतर लोकही आपल्या नांवावर प्रचलित करतील ह्मणून जगन्नाथानें तीं सगळीं पद्यें प्रस्तुत ग्रंथाच्या रूपानें एके ठिकाणीं केलीं असें भामिनीविलासांतील शेवटच्या पद्यावरून लक्ष्यांत येईल.[1]

प्रस्तुत काव्याला कवीनें भामिनीविलास हें नांव कां दिलें याच्यासंबंधानें थोडा मतभेद आहे. प्रो. तारानाथ यांचें मत असें आहे कीं, भामिनी नांवाची जगन्नाथाची स्त्री होती तिच्या स्मरणार्थ प्रस्तुत ग्रंथ त्यानें रचला. भामिनी हा शब्द केवळ विशेषनामासारखा प्रस्तुत काव्यांत अनेक ठिकाणीं योजलेला आहे.[2] यावरून वरील मत ग्राह्य आहे असें दिसून येईल. शिवाय जगन्नाथाचा नातू महादेव यानें भामिनीविलासावर टीका केली आहे. तिच्यांत करुणविलासांतर्गत प्रथमपद्यांतील 'बंधुरत्नें' या पदावर त्यानें 'गृहिण्याम्' असा पर्याय दिला आहे.[3] यावरूनही वरील मताला अधिक पुष्टि येते. कोणाचें मत असें आहे कीं, भामिनी ही एक कल्पित नायिका होती तिला उद्देशून कवीनें प्रस्तुत ग्रंथ लिहिला.

भामिनीविलासग्रंथाचे चार विलास अथवा भाग आहेत. पहिला अन्योक्तिविलास किंवा प्रास्ताविकविलास. यांत

---

१ दुर्वृत्ता जारजन्मानो हरिष्यन्तीति शंकया। मदीयपद्यरत्नानां मञ्जूषैषा कृता मया ॥. २ शृंगारविलास श्लोक पहिला. करुणाविलास श्लोक चवथा आणि सतरावा. आणखीही उदाहरणें सांपडतील. ३ रा. रा. परांजपे यांची प्रस्तावना पृष्ठ २०.

बहुतेक अन्योक्ति आहेत आणि कांहीं केवळ सुभाषितें आहेत. हा अन्योक्तिविलास फार सुंदर व बोधप्रद आहे. कारण अन्योक्तिरूपानें यांत कवीनें व्यवहारांतील किती तरी गोष्टी मार्मिक रीतीनें सुचविल्या आहेत! प्रस्तुतविलास प्रसन्न व रमणीय असा व्यवहारादर्शच आहे असें वाटतें. विद्यार्थ्यांनीं हा विलास गुरुमुख शिकून पाठ करून ठेवण्यासारखा आहे. बहुश्रुत व चतुर हरिदास प्रस्तुत विलासांतील अन्योक्ति ह्मणून कीर्तनास मोठा रंग आणतात.

दुसरा शृंगारविलास. यांत विलासाचे अनेक प्रसंग कल्पून कवीनें भामिनीविषयक लीला वर्णिल्या आहेत. यांतील कांहीं श्लोकांत शृंगाराचा अतिरेक झाला आहे यास्तव त्यांचें मराठींत भाषांतर केलें नाहीं. तथापि वाचणारांना मूलग्रंथ समग्र मिळावा एवढ्याकरितां ते श्लोक या ग्रंथाला जोडलेल्या पहिल्या परिशिष्टांत दिले आहेत. या विलासांत कित्येक पद्यें फारच मधुर आहेत.

तिसरा करुणविलास. आपली पत्नी लोकांतराला गेली तेव्हां कवीनें तिच्यासंबंधानें आपले उद्गार या विलासांत पद्यांमध्यें ग्रथित केले आहेत. कविकुलगुरूच्या अजविलापांतील कल्पनाचातुर्य व रसपरिपोष हीं प्रस्तुत करुणरसप्रधान चुटक्यांत अनुभवाला येत नाहींत. प्राणप्रियेच्या विरहानलज्वालेनें होरपळून जाणाऱ्या कवीच्या निसर्गसिद्ध करुणालापांत श्लेषचमत्काराला अवकाशच मिळूं नये. तथापि तसा प्रकार करुणविलासांत आढळतो[1]. असो. कै० कृष्णशास्त्री चिपळुणकर यांनीं करुणविलासाचें शिखरिणीवृत्तांत मराठी भाषांतर करून तें आपल्या रसिकमान्य पद्यरत्नावलीकाव्यांत छापिलें आहे.

---

१ श्लोक सतरावा.

चवथा शांतविलास. यांत बहुतेक भक्तिरसात्मक श्लोक आहेत. आणि ते फार प्रेमळ आणि गोड आहेत. प्रतिपाद्यविषयाशीं तादात्म्य पावणें हें खऱ्या कवीचें लक्षण आहे. हें जगन्नाथाच्या काव्यांत चांगलें प्रतीतीस येतें. रससंबंधानें परस्परविरोधी किंवा परस्पराहून भिन्न अशा भर्तृहरिकृत तिन्ही शतकांत जसा चहूंकडे एक थाट; किंवा प्रसिद्ध महाराष्ट्र कवि रामजोशी यांच्या शृंगारावरील आणि वैराग्यपर लावण्यांत जसा येथून तेथून एक रंग; तसाच प्रकार पंडितांच्या प्रस्तुत चारी विलासांमध्यें आढळून येतो.

शांतविलासाचीं कांहीं पद्यें कवीनें आत्मश्लाघापर रचिलीं आहेत. कविकुलगुरूनें अनेक स्थलीं आपली परमशालीनता व्यक्त करावी आणि जगन्नाथकवीनें ठिकठिकाणीं आपल्यासंबंधानें दर्पोक्ति प्रकट करावी यांत मनुष्यस्वभावाचें वैचित्र्य तर दृग्गोचर होतेंच; तथापि आपल्या कृतीचा अनादर होऊं लागल्यामुळें भवभूतीप्रमाणें याही कवीला आत्मप्रशंसा करण्याचा प्रसंग आला कीं काय अशी शंकाही मनांत येते;[१] तरी पण पंडितांच्या उज्ज्वल गुणांना विनयानें अधिक शोभा आली असती असें लिहिल्याखेरीज राहवत नाहीं!

आतां प्रस्तुत भाषांतराविषयीं चार शब्द लिहितों. आमचे नासिक येथील प्रसिद्ध संस्कृतकवि पंडित अच्युतराय मोडक यांनीं प्रणयप्रकाश नांवाची टीका भामिनीविलासग्रंथावर केली आहे. या टीकेसहित तो ग्रंथ निर्णयसागरांत छापून प्रसिद्ध झाला आहे. यांतील मूल—क्वचित् कोठें पाठान्तरादिक फेरफार करून—भाषांतराकरितां कायम केलें आहे. मूळांतील श्लोकाचा

---

१ शांतविलासांतील 'मद्वाणि मा कुरु विषादमनादरेण' इत्यादि श्लोक पहा.

  

तात्पर्यार्थ मनांत आणून तो भाषांतरांत आणण्याचा प्रयत्न केला आहे; आणि एवढ्याच अर्थानें भाषांतराला छाया असें ह्मटलें आहे. मूळांतील एका श्लोकाचा भाषांतरांत प्रायः एकच श्लोक झाला आहे. विशेषतः 'मेघदूत काव्याचें सम-वृत्त मराठी भाषान्तर' यांत, आणि एके ठिकाणीं 'पद्य-मंजरी' काव्यांत जसा पूर्णश्लोकापुढें श्लोकार्ध घातला आहे तसा प्रकार प्रस्तुत भाषांतरांत कोठेंही नाहीं. मूळांतील वृत्तांहून भाषांतरांत कोठें कोठ भिन्न वृत्तें योजलीं आहेत. साकी आणि दिंडी या प्राकृत परंतु गोड वृत्तांचा स्थलविशेषीं आदर केला आहे. मूलश्लोक वरतीं देऊन त्याच्या खालीं भाषांतराचा श्लोक दिला आहे. त्यामुळें भाषांतर कसें उतरलें आहे हें वाच-णारांस अनायासें समजेल. श्लोकांतील कठिण शब्दांचा अर्थ पृष्ठाखालीं टिपांतून दिला आहे. श्लोकांचा मार्मिक अर्थ विद्या-र्थ्यांस समजावा या हेतूनें या ग्रंथाला जोडलेल्या दुसऱ्या परि-शिष्टांत संक्षिप्त टिपा दिल्या आहेत. यांत रस, ध्वनि, अलंकार, पदस्वारस्य, वृत्त इत्यादि गोष्टींचें थोडेंबहुत दिग्दर्शन केलें आहे. क्वचित् पाठान्तरें देऊन दुसरेही कांहीं अल्पस्वल्प फेरफार केले आहेत. भाषांतर तात्पर्यार्थरूपानें असल्यामुळें मूळांतल्यापेक्षां त्यांत अलंकारादिकांचा न्यूनाधिकभाव झाला आहे. त्याचेंही स्पष्टीकरण या टिपांत यथामति केलें आहे.

अच्युतरावजी मोडक यांच्या टीकेसह निर्णयसागरांत छाप-लेला भामिनीविलास, रा. रा. शिवराम महादेव परांजपे, एम्. ए., यांनीं इंग्रजी शिकणाऱ्या विद्यार्थ्यांकरितां छापून प्रसिद्ध केलेली भामिनीविलासाची सुंदर आवृत्ति; कै० पंडित दुर्गा-प्रसाद यांनीं शुद्ध केलेला आणि निर्णयसागरांत छापून प्रसिद्ध

झालेला रसगंगाधरग्रंथ; आणि दुसरींही कांहीं पुस्तकें यांच्या आधारानें प्रस्तुत भाषांतर तयार केलें आहे.

हें भाषांतर सगळें छापून तयार झाल्यावर दुसरें परिशिष्ट लिहिण्याचा आयते वेळीं विचार झाला. त्यामुळें तें फार घाईनें लिहावें लागलें. यास्तव सदर परिशिष्टांत प्रमादस्थलें राहिलीं असतील. शिवाय भाषांतरांतही दोष आढळतील. त्या सर्वांचें संशोधन करून प्रस्तुत अल्प प्रयत्नास पूर्णता आणण्याचें श्रेय काव्यरसज्ञ सहृदय विद्वान् आपणांकडे घेतील अशी आशा आहे.

पुणें, सदाशिवपेठ.<br>श्रावण व. ८ शके १८२५. } लक्ष्मण गणेशशास्त्री लेले.

# MAHARASHTRA BHAMINIVILAS.

## ( BY LAXMAN SHASTRI LELE )

Mr. Laxman Shastri Lele of Nasik, the author of the two excellent little books, the one the 'Marathi Translation of Meghaduta into the same metre as the original,' and the other the 'Padyamanjari,' appears before the public with his third production, 'the Maharashtra Bhaminivilas,' a translation of the Bhaminivilas of Jagannath into Marathi verse. The author has evidently been at no small pains in preparing this charming volume. The introduction is delightful. It clearly and briefly supplies almost every thing that is needed in the way of information as to the Bhaminivilas, its author and other kindred matters. The Marathi renderings, which are printed with the original, fully reproduce in almost every case the spirit of the original, often in the happiest way. The verses are generally simple, sweet & flowing. The style is exceptionally chaste, dignified & elegant. The section that treats of the figures of speech & other critical points that occur in the translation, is admirably handled, & will prove of material assistance to the advanced student of Marathi poetry. Altogether the performance deserves high commendation.—A CRITIC.

---

( वरील अभिप्रायाचें मराठी भाषांतर )

# महाराष्ट्र भामिनीविलास.

## लक्ष्मणशास्त्री लेलेकृत

'मेघदूताचें समवृत्त मराठी भाषांतर,' आणि 'पद्यमंजरी' या दोन उत्कृष्ट छोटेखानी पुस्तकांचे कर्ते रा. रा. लक्ष्मणशास्त्री लेले, नासिककर, यांनीं 'महाराष्ट्र भामिनीविलास' या नांवाचें तिसरं पुस्तक प्रसिद्ध केलें आहे. हा रमणीय ग्रंथ रचण्याचे कामीं ग्रंथकर्त्यांनीं बहुत परिश्रम केले आहेत हें सहज लक्षांत येण्यासारखें आहे. ग्रंथाला जोडलेली प्रस्तावना रम्य आहे. भामिनीविलास, त्याचा कर्ता आणि तत्संबंधी अवांतर गोष्टी, यांच्यासंबंधानें आवश्यक तितकी बहुतेक माहिती तिच्यांत दिलेली आहे. भाषांतर मूळासह छापलें आहे. मूळांतील आशय भाषांतरांत प्रायः पूर्णपणें व फार सफाईनें उतरला आहे. कविता एकंदरींत सरळ, मधुर आणि श्रवणसुंदर आहे. भाषांतरकारांची वाणी अत्यंत शुद्ध, प्रौढ आणि अलंकारिक आहे. भाषांतरांतील अलंकार आणि इतर मार्मिक गोष्टी यांचें विवरण दुसऱ्या परिशिष्टांत केलें आहे. यांत ग्रंथकारांनीं दाखविलेलें चातुर्य वर्णनीय आहे. मराठी काव्याचा व्यासंग करणाऱ्या विद्यार्थ्यांना सदर परिशिष्टाचा विशेष उपयोग होईल. एकंदरींत प्रस्तुत ग्रंथ विशेष प्रशंसापात्र आहे.

—एक मर्मज्ञ.

॥ श्रीः ॥

# महाराष्ट्र भामिनीविलास.



## अन्योक्तिविलास.



मूल.

दिगन्ते श्रूयन्ते मदमलिनगण्डाः करटिनः
करिण्यः कारुण्यास्पदमसमशीलाः खलु मृगाः ।
इदानीं लोकेऽस्मिन्ननुपमशिखानां पुनरयं
नखानां पाण्डित्यं प्रकटयतु कस्मिन् मृगपतिः ॥ १ ॥

छाया.

दिगन्ताला गेलें करिकुल मदोन्मत्त निघुनी
असें येई कर्णी, असति करुणापात्र करिणी ।
दुजे सारेही ते मृग निजबळें न्यून दिसती
कुठें आतां दावी प्रखरनखलीला मृगपति ! ॥ १ ॥

मूल.

पुरा सरसि मानसे विकचसारसालिस्खल-
त्परागसुरभीकृते पयसि यस्य यातं वयः ।
स पल्वलजलेऽधुना मिलदनेकभेकाकुले
मरालकुलनायकः कथय रे कथं वर्तताम् ॥ २ ॥

---

१ दया करण्याला योग्य. २ हत्तिणी. ३ पशु. ४ तीव्रनखांचा विलास. ५ सिंह.

छाया.

परा[1]ग कमलांतला करि सुगंध य[2]ज्जीवन
अशा रुचिर मा[3]नसीं प्रथम जो करी जी[4]वन ।
द्विजें[5]द्र कलहंस तो वसति केविं आतां करी
वदें मलिन[6]पल्वलीं, जमति ज्यांत भेकां[7]वली ॥ २ ॥

मूल.

तृष्णालोलविलोचने कलयति प्राचीं चकोरीगणे
मौनं मुंचति किंच कैरवकुले कामे धनुर्धुन्वति ।
माने मानवतीजनस्य सपदि प्रस्थातुकामेऽधुना
धातः किंनु विधौ विधातुमुचितो धाराधराडंबरः ॥३॥

छाया.

[8]तृष्णाचंचल त्या चकोर[9]वधू प्राचीकडे *पाहतां
प[10]द्मांली हं[11]सतां, अ[12]नंग धनुचा टं[13]कार ही काढितां ।
प्र[14]स्थानोत्सुक मान होत असतां मानी स्त्रियांचा त[15]सो
मे[16]घाडंबर धाडिशी विधुवरी, बापा विधा[17]त्या, कसा ? ॥ ३ ॥

मूल.

अयि दलदरविंद स्यन्दमानं मरन्दं
तव किमपि लिहन्तो मंजु गुंजंतु भृंगाः ।

---

१ रज. २ ज्यांतील उदक. ३ मानससरोवरांत. ४ वृत्ति, वसति. ५ पक्षिश्रेष्ठ. ६ घाणेरड्या डबक्यांत. ७ बेडकांच्या पंक्ति. ‘स्मितांबुरुहरेणुंनीं अतिसुगंध यज्जीवन’ असें पहिल्या चरणाबद्दल पाठान्तर समजावें. ८ तहानेनें कावऱ्याबावऱ्या झालेल्या. ९ चकोरी. * पहात असतां. १० (चंद्रविकासी) कमळांच्या पंक्ति. ११ प्रफुल्लित होत असतां. १२ मदन. १३ टणत्कार. १४ निघून जाण्याकरितां उत्कंठित. ‘जाया उत्सुक’ असें पाठान्तर. १५ आणि. १६ मेघमंडळ. १७ [illegible] !

दिशि दिशि निरपेक्षस्तावकीनं विवृण्वन्
परिमलमयमन्यो बांधवो गंधवाहः ॥ ४ ॥

छाया.

तव मधुरं[1] +मरन्द स्वेच्छ लोभे[2] जयांना
अलि[3], कमलवरा[4], ते मंजु[5] घेवोत ताना।
पवन फुकट वाही गंध दाही दिशांला
खचित तव असे तो बंधु कांहीं निराळा ! ॥ ४ ॥

मूल.

समुपागतवति दैवादवहेलां कुटज मधुकरे मा गाः।
मकरन्दतुन्दिलानामरविन्दानामयं महामान्यः ॥ ५ ॥

छाया.

कुटजा[6], दैवें आला मधुकर[7], त्याला न दावि अवमान।
रसपूर्ण कमलिनी त्यां[8] दाविति आदर, जयासि सीमा[9] न ॥ ५ ॥

मूल.

तावत्कोकिल विरसान् यापय दिवसान् वनान्तरे निवसन्।
यावन्मिलदलिमालः कोऽपि रसालः समुल्लसति ॥ ६ ॥

छाया.

जमतिल रसालतरुवरि[10] उद्यानीं भृंगसंघ[11] रसिकवर।
कंठावे विपिनांतरिं[12] नीरस दिन कोकिला तुवां तंवरी[13] ॥ ६ ॥

मूल.

नितरां नीचोऽस्मीति त्वं खेदं कूप मा कदापि कृथाः।
अत्यन्तसरसहृदयो यतः परेषां गुणग्रहीतासि ॥ ७ ॥

---

१ गोड+रस. २ मिळतो. ३ भ्रमर. ४ अगा कमलश्रेष्ठा! ५ मंजुळ. ६ अगा कुड्याच्या फुला! ७ भ्रमर. ८ मधुकराला. ९ मर्यादा. १० आंब्याच्या झाडावर. ११ भ्रमरांचे थवे. १२ रानांत. १३ तोंपर्यंत.

छाया.

मी परम *नीच ऐसें समजुनि कूपा, करीं न खेद मनीं ।
अति[1]सरसहृदय तेवीं असशी बहु चतुर पर[2]गुणग्रहणीं ॥ ७ ॥

मूल.

कमलिनि मलिनीकरोषि चेतः
किमिति बकैरवहेलितानभिज्ञैः ।
परिणतमकरन्दमार्मिकास्ते
जगति भवन्तु चिरायुषो मिलिन्दाः ॥८ ॥

छाया.

कमलिनि, [3]बक [4]हेलना करीतां
ह्मणुनि वि[5]षाद धरीशि काय चित्तीं ? ।
परि[6]णतमकरन्दमर्मवेत्ते
भ्रमर चि[7]रायु असोत भूतलीं [8]ते ॥ ८ ॥

मूल.

येनामन्दमरन्दे दलदरविंदे दिनान्यनायिषत ।
कुटजे खलु तेने हा तेने हा मधुकरेण कथम् ॥ ९ ॥

छाया.

ज्यानें रसपरिपूर्णप्रफुल्लकमलांत दिवस घालविले ।
मन त्याच मधुकराचें कुटजानें केंवि आजि लोभविलें ॥ ९ ॥

---

*अधम. १ अत्यंत प्रेमयुक्त अन्तःकरण ज्याचें असा. २ दुसऱ्याच्या आंगच्या गुण घेण्याविषयीं. नीच, रस, हृदय आणि गुण यांचे अनुक्रमें खोल, उदक, अन्तःप्रदेश आणि दोरखंड असे दुसरे अर्थ आहेत त्यांवरून श्लेष व्यक्त होईल. ३ बगळे. ४ अपमान. ५ खेद, दुःख. ६ परिपक्व रसाची खुबी जाणणारे. ७ पुष्कळ आहे आयुष्य ज्यांना असे. ८ जगत्प्रसिद्ध.

मूल.

अयि मलयज महिमानं कस्य गिरामस्तु विषयस्ते ।
उद्गिरतो यद्गरलं फणिनः पुष्णासि परिमलोद्गारैः ॥१०॥

छाया.

कवण शके वर्णाया तव महिमा चन्दना, जनीं वद रे
टाकिति गरल[1] मुखानें त्या भुजंगां[2] पोषितोसि गंधभरें[3] ॥ १० ॥

मूल.

पाटीर तव पटीयान् कः परिपाटीमिमामुरीकर्तुम् ।
यत् पिंषतामपि नृणां पिष्टोऽपि तनोषि परिमलैः पुष्टिम् ११

छाया.

जे खंडुनि[4] चूर्णिति[5] तुज, सुखविशी[6] गंधें तयांहि मनुजांला !
पाटीरा[7], क्रम[8] तव हा शके[9] असे कवण आदरायाला ? ॥११॥

मूल.

नीरक्षीरविवेके हंसालस्यं त्वमेव तनुषे चेत् ।
विश्वस्मिन्नधुनान्यः कुलव्रतं पालयिष्यति कः ॥ १२ ॥

छाया.

नीरक्षीरविवेचनिं[10], हंसा, आलस्य तूंचि करिशील
त्रिभुवनिं तरि कवण दुजा सांग कुलव्रत[11] अखंड[12] पाळील ? ॥१२॥

मूल.

उपरि करवालधाराकाराः क्रूरा भुजंगपुंगववत् ।
अन्तः साक्षाद्द्राक्षादीक्षागुरवो जयन्ति केऽपिजनाः १३

१ विष. २ सर्पांना. ३ विपुल वासानें. ४ तोडून. ५ चुरतात. ६ सुख देतोस. ७ अगा चन्दना! ८ परिपाट, वहिवाट. ९ समर्थ. १० पाणी आणि दूध यांच्या मिश्रणांतून तीं दोन द्रव्यें वेगळीं करण्याच्या कामांत ११ नीरक्षीरविवेक हा हंसांचा पिढीजाद धंदा आहे. १२ एकसारखें.

छाया.

अ[1]सिधारेसम तीव्र, क्रू[2]रभुजङ्गेन्द्रतुल्य वैरि दि[3]सती
द्राक्षाहुनि गोड अधिक अं[4]तरिं; जन थोर भूमि भूषविती ॥ १३ ॥

मूल.

स्वच्छन्दं दलदरविन्द ते मरन्दं
विन्दन्तो विदधतु गुञ्जितं मिलिन्दाः ।
आमोदानथ हरिदन्तराणि नेतुं
नैवान्यो जगति समीरणात् प्रवीणः ॥ १४ ॥

छाया.

स्वच्छन्दें अलि लुटुनी तुझा मर[5]न्द
गावोत, स्मि[6]तसरसीरुहा ! अमं[7]न्द ।
गंधातें तव विखरावया जगांत
कोणांही नच पवनाविणें[8] समर्थ ॥ १४ ॥

मूल.

याते मय्यचिरान्निदाघमिहिरज्वालाशतैः शुष्कतां
गंता कं प्रति पान्थसंततिरसौ सन्तापमालाकुला ।
एवं यस्य निरन्तराधिपटलैर्नित्यं वपुः क्षीयते
धन्यं जीवनमस्य मार्गसरसो धिग्वारिधीनां जनुः ॥ १५ ॥

छाया.

माझी ही तनु चं[9]डभानुकिरणीं ग्रीष्मीं कृशा होइल
संतापा[10]कुल पांथसंहति[11] तदा कोणाकडे पाहिल ।

---

१ तरवारीच्या धारेप्रमाणें. २ दुष्टसर्पश्रेष्ठासारखे. ३ वरून, दिसण्यांत. ४ आंतल्या बाजूला; अर्थात् मनानें किंवा स्वभावानें. ५ रस. ६ प्रफुल्लित कमळा ! ७ एकसारखें. ८ 'पवनाशिवाय शक्त' असें पाठान्तर. ९ सूर्याच्या प्रखर किरणांनीं. १० मोठ्या तापानें व्याकुळ. ११ प्रवासी लोकांचा समुदाय.

लागे अन्तरिं[1] सारखें झुरणिला कासार[2] या औधिनें[3]
त्याचें जीवन[4] धन्य होय भुवनीं, धिग् वारिधींचें[5] जिणें ॥ १५ ॥

मूल.

आपेदिरेऽम्बरपथं परितः पतङ्गाः
भृङ्गा रसालमुकुलानि समाश्रयन्ति ।
संकोचमञ्चति सरस्त्वयि दीनदीनो
मीनो नु हन्त कतमां गतिमभ्युपैतु ॥ १६ ॥

छाया.

गेले नभीं चहुंकडे उडुनी पतंग[6]
बैसे रसालकलिकांवरि[7] भृंगसंघ[8] ।
पद्माकरा[9] ! तनु तुझी सुकतांचि हाय !
हा दीन मीनें[10] गतिहीन करील काय ? ॥ १६ ॥

मूल.

मधुप इव मारुतेऽस्मिन् मा सौरभलोभमम्बुजिनि मंस्थाः
लोकानामेव मुदे महितोप्यात्मासुनार्थितां नीतः ॥१७॥

छाया.

मधुपासम[11] हा मारुत[12] तव सौरभलोभ[13] करितसे न मनीं !
*बहुमान्य,अम्बुजिनि[14]! तरि जनतोपास्तवचि[15] सिद्ध तव नमनीं १७

मूल.

गुञ्जति मञ्जु मिलिन्दे मालति मा मौनमुपयासीः
शिरसा वदान्यगुरवः सादरमेनं वहन्ति सुरतरवः ॥१८॥

---

१ मनामध्यें. २ सरोवर. ३ मनांतील चिन्तेनें. ४ उदक, श्लेषानें जिणें. ५ समुद्रांचें. ६ पक्षी. ७ आंब्याच्या मंजिऱ्यांवर. ८ भ्रमरांचे समुदाय. ९ हे सरोवरा. १० मासा. ११ भ्रमरासारखा. १२ वारा. १३ सुगंधाची इच्छा. *हें 'मारुत' याचें विशेषण. १४ हे कमलवल्लि. १५ लोकरंजनार्थ.

छाया.

मंजुल गुंजत असतां अलि, मालति, तूं कधीं न मौन धरीं।
त्याला वदान्यगुरु सुर-तरु धरिती फार आदरें स्वशिरीं ॥१८॥

मूल.

यैस्त्वं गुणगणवानपि सतां द्विजिह्वैरसेव्यतां नीतः।
तानपि वहसि पटीरज किं कथयामस्त्वदीयमौन्नत्यम् १९

छाया.

धरिशी द्विजिव्हे तनुवरि, यत्संगें संत अरुचि तुज दावी।
गुणवन्ता पाटीरा! उन्नति किती ही त्वदीय वानावी?॥१९॥

मूल.

अपनीतपरिमलान्तरकथे पदं न्यस्य देवतरुकुसुमे।
पुष्पान्तरेऽपि गन्तुं वाञ्छसि चेद् भ्रमर धन्योऽसि ॥२०॥

छाया.

बैसुनि सुरतरुकुसुमीं, जें लाजवि गंध भूवरी अन्य।
जायातेंहि सुमान्तरिं इच्छिसि तरि, षट्पदा, तुझी धन्य! ॥२०॥

मूल.

तटिनि चिराय विचारय विन्ध्यभुवस्तव पवित्रायाः।
शुष्यन्त्या अपि युक्तं किं खलु रथ्योदकादानम् ॥२१॥

छाया.

अयि विन्ध्यैकन्यके, करिं मानसिं सुविचार, पावने तटिनि।
रथ्याजलग्रहण तुज उचित असे काय? जाशि जरि सुकुनी२१

---

१ उदार लोकांत श्रेष्ठ. २ सर्प; श्लेषानें दोन जिभा असणारे ह्मणजे दुटप्पी बोल ।र खल. ३ द्विजिव्हांच्या संगतीमुळें. ४ अप्रीति. ५ मोटेपणा, थोरपणा. ६ देववृक्षाच्या फुलावर. ७ सुरतरुकुसुम. ८ दुसऱ्या फुलावर ९ भ्रमरा! १० विन्ध्यपर्वतापासून निघणारे. हें 'तटिनि' याचें विशेषण. ११ पवित्र. १२ हे नदि. १३ रस्त्यांतील पाणी घेणें.

मूल.

पत्रफलपुष्पलक्ष्म्या कदाप्यदृष्टं वृतं च खलु शूकैः
उपसर्पेम भवन्तं बर्बुर वद कस्य लोभेन ॥ २२ ॥

छाया.

नोहे फल, नोहे दल, नोहे सुम, बाभुळा! भंवतिं कांटे
वैभव तव हें पाहुनि लाज तुझ्या जवळिं यावया वाटे ॥२२॥

मूल.

एकस्त्वं गहनेऽस्मिन् कोकिल न कलं कदाचिदपि कुर्याः
साजात्यशंकयामी न त्वां निघ्नन्ति निर्दयाः काकाः॥२३॥

छाया.

असहाय कोकिला तूं विपिनीं या; कधिं इथें न करिं गान
समजातीय समजुनी रक्षिति तव अद्य काक हे प्राण!॥२३॥

मूल.

तुरुकुलसुषमापहरां जनयन्तीं जगति जीवजातार्तिम्
केन गुणेन भवानीतात हिमानीमिमां वहसि ॥ २४ ॥

छाया.

तरुकुललक्ष्मी हरिते, सकलां जीवांस दुःख देते ही
काय ह्मणोनि हिमानी धरिशि भवानीपित्या! शिरावरि ही॥२४॥

मूल.

कलभ तवान्तिकमागतमलिमेनं मा कदाप्यवज्ञासीः
अपि दानसुन्दराणां द्विपधुर्याणामयं शिरोधार्यः॥ २५॥

---

१ अगा बाभळीच्या झाडा! २ एकटा. ३ आपल्या जातीचा. ४ झाडांच्या समुदायाची शोभा. ५ सुद्धां, तसेंच. ६ बर्फाची रास. ७ अगा हिमालया

छाया.

कॅरिवाळा ! तुजजवळीं आला अलि, त्याजला न अवमानीं
धरिती निजशिरिं त्याला दानमनोहर करीन्द्रही मानीं ॥ २५ ॥

मूल.

अमरतरुकुसुमसौरभसेवनसंपूर्णसकलकामस्य
पुष्पान्तरसेवेयं भ्रमरस्य विडम्बना महती ॥ २६ ॥

छाया.

देवद्रुमसुमगंधा सेवुनियां पूर्णकाम जो झाला
त्या भ्रमरेंचि रमावें अन्यसुमीं ! काळिमाच हा त्याला ॥२६॥

मूल.

पृष्टाः खलु परपुष्टाः परितो दृष्टाश्च विटपिनः सर्वे
माकन्द न प्रपेदे मधुपेन तवोपमा जगति ॥ २७ ॥

छाया.

पुशिलें पिकांस पुरतें, द्रुम हुडकुनि सर्व पाहिलेहि वनीं
परि आम्रा ! तव उपमा मधुपाला लाभली न या भुवनीं ॥२७॥

मूल.

तोयैरल्पैरपि करुणया भीमभानौ निदाघे
मालाकार व्यरचि भवता या तरोरस्य पुष्टिः ।
सा किं शक्या जनयितुमिह प्रावृषेण्येन वारां
धारासारानपि विकिरता विश्वतो वारिदेन ॥ २८ ॥

---

*अगा सिंहचालका ! १ गंडस्थलांतून वाहणाऱ्या मदानें सुंदर. २ हस्तिश्रेष्ट. ३ दर्पयुक्त. ४ देववृक्षांच्या फुलांचा वास. ५ पुरी झाली आहे इच्छा ज्याची असा. ६ दुसऱ्या फुलावर. ७ कोकिलांना. ८ झाडें. ९ साद्दश्य, तुलना. १० भ्रमराला. ११ मिळाली, आढळली.

छाया.

ग्रीष्मीं[1] भानुप्रखरकिरणीं पुष्टि जी या तरूशीं
मालाकारा[2] ! करुनि करुणा, अल्पतोयेंहि देशी ।
ती कां बापा, कधिं तरि असे शक्य त्या वारिदाला[3]
धो धो वर्षासमयिं[4] वितरी[5] जो जनीं वारिधारा ॥ २८ ॥

मूल.

आरामाधिपतिर्विवेकविकलो नूनं रसा नीरसा
वात्याभिः परुषीकृता दश दिशश्चण्डातपो दुःसहः ।
एवं धन्वनि चंपकस्य सकले संहारहेतावपि
त्वं सिंचन्नमृतेन तोयद कुतोप्याविष्कृतो वेधसा ॥ २९ ॥

छाया.

माळी मूढ, नितान्त[6] शुष्क अवनी[7], तापे रवी अंबरीं[8]
मोठ्या वावटळीमुळें परुषता[9] दाही दिशांभीतरी
ऐसें संकट चंपकांवरि[10] मरुप्रांतांत[11] येतां, घना !
दैवें धाडियलें कसें तरि तुला द्याया तयां[12] जीवनां[13] ॥ २९ ॥

मूल.

न यत्र स्थेमानं दधुरतिभयभ्रान्तनयना
गलद्दानोद्रेकभ्रमदलिकदंबाः करटिनः ।
लुठन्मुक्ताभारे भवति परलोकं गतवतो
हरेरद्य द्वारे शिव शिव शिवानां कलकलः ॥ ३० ॥

---

१ सूर्याचें कडक ऊन आहे ज्यांत अशा; हें 'ग्रीष्मीं' याचें विशेषण. २ अगा माळ्या. ३ मेघाला. ४ पावसाळ्यांत. ५ देतो, सोडतो. ६ फार. ७ जमीन. ८ आकाशांत. ९ रखरखीतपणा. १० चंपकवृक्षावर. ११ मारवाडांत. १२ चंपकाला. १३ उदक; श्लेषानें जीव.

छाया.

न जेथें भीतांनें निवसति मदोन्मत्त करेटी
जिथें मुक्तामाला करिवरविमुक्ता विखुरती ।
अहा ! आतां जातांक्षणिंच परलोका मृगपती
तयांच्या त्या द्वारीं शिव शिव शिवा घोर्ष करिती ॥ ३० ॥

मूल.

दधानः प्रेमाणं तरुषु समभावेन विपुलां
न मालाकारोऽसावकृत करुणां बालबकुले ।
अयं तु द्रागुद्यत्कुसुमनिकराणां परिमलै-
र्दिगन्तानातेने मधुपकुलझंकारभरितान् ॥ ३१ ॥

छाया.

करी मालाकार प्रकट समदृष्टी तरुकुलीं
न दावी तो येथें विपुलकरुणा बालबकुलीं ।
परी हा एकाकी निजकुसुमगंधास विखरी
दिशा दाही, पाहीं, अलिमधुरवें संकुल करी ॥ ३१ ॥

मूल.

मूलं स्थूलमतीव बन्धनदृढं शाखाः शतं मांसला
वासो दुर्गमहीधरे तरुपते कुत्रास्ति भीतिस्तव ।
एकः किन्तु मनागयं जनयति स्वान्ते ममाधिज्वरं
ज्वालालीवलयीभवन्नकरुणो दावानलो घस्मरः ॥३२॥

---

१ राहतात. २ हत्ती. ३ मोत्यांच्या पंक्ति. ४ मोठाल्या हत्तीं ( च्या गंडस्थला ) पासून गळून पडलेल्या. ५ पसरतात. ६ त्या मृगपतीच्या. ७ कोल्ह्या. ८ ओरड, हाकाटी, कोल्हेकुई. ९ प्रकट करी असा अन्वय. १० वृक्षसमुदायावर. ११ पुष्कळ दया. १२ लहान बकुळीच्या झाडावर. १३ एकटा. १४ आपल्या फुलांचा वास. १५ भ्रमरांच्या मधुर गुंजारवानें. १६ व्याप्त, पूर्ण.

छाया.

मूळ[1] स्थूळ[2] सुबद्ध[3], पुष्ट शतशा[4] शाखा[5], महापादपा[6] !
दुर्गी[7] भूधरिं[8] वास[9], भीति कुठुनी आहे तुला सांग पा ? ।
ज्वालादारुण[10], सर्वभक्षक असा हा क्रूर दावानल[11]
थोडासा परि माझिया उपजवी चित्तांत चिन्ताज्वर[12] ॥३२॥

मूल.

ग्रीष्मे ग्रीष्मतरैः करैर्दिनकृता दग्धोऽपि यश्चातक–
स्त्वां ध्यायन् घन वासरान् कथमपि द्राघीयसो नीतवान् ।
दैवाल्लोचनगोचरेण भवता तस्मिन्निदानीं यदि
स्वींचक्रे करकानिपातनकृपा तत् कंप्रति ब्रूमहे ॥३३॥

छाया.

गेलें होरपळोनि अंग रविच्या तापें [13]निदाघीं, तरी
ध्याऊनी[14] तुज, अब्दसे[15] दिन, घना, जो कंठि कैसे तरी ।
दैवें दृष्टि पडोनि वृष्टि करिशी त्या चातकाच्या वरी
गारांची, करुणाकरा जलधरा ! हा बोल कोणा तरी ॥ ३३ ॥

मूल.

दवदहनजटालज्वालजालाहतानां
परिगलितलतानां म्लायतां भूरुहाणां ।
अयि जलधर शैलश्रेणिशृंगेषु तोयं
वितरसि बहु कोऽयं श्रीमदस्तावकीनः ॥ ३४ ॥

---

१ बुंधा. २ मोठा. ३ जमिनींत चांगला दृढ झालेला. ४ शेंकडों. ५ खांद्या. ६ मोठ्या वृक्षा. ७ चढण्यास कठीण अशा. हें 'भूधरिं' याचें विशेषण. ८ डोंगरावर. ९ वस्ती. १० ज्वालांच्या योगानें भयंकर. ११ वणवा. १२ चिंतारूप ताप. १३ उष्ण कालांत. १४ चिन्तन करून १५ वर्षासारखे.

छाया.

गळुनि पडति वेली खालतीं, म्लान होती
तरुवर दणव्यानें दग्ध होवोनि जाती ।
वितिरिशि जलधारा शैलशृंगीं अहाहा !
विभवमद तुझा हा केवढा अंबुवाहा ! ॥ ३४ ॥

मूल

शृण्वन् पुरः परुषगर्जितमस्य हन्त
रे पान्थ विव्हलमना न मनागपि स्याः ।
विश्वार्तिवारणसमर्पितजीवनोऽयं
नाकर्णितः किमु सखे भवताम्बुवाहः ॥ ३५ ॥

छाया.

ऐकोनि हा गडगडाट भयाण कानीं
तूं अल्पही न, पंथिका ! मनिं भीति आणीं ।
जो विश्वताप हरि देउनि जीवनाला
तो अंबुद श्रवणिं काय तुझ्या न आला? ॥ ३५ ॥

मूल.

सौरभ्यं भुवनत्रयेऽपि विदितं शैत्यं तु लोकोत्तरं
कीर्तिः किंच दिगङ्गनांगणगता किंत्वेतदेकं शृणु ।
सर्वानेव गुणानियं निगिरति श्रीखण्ड ते सुन्दरा-
नुज्झन्ती खलु कोटरेषु गरलज्वालां द्विजिव्हावली ॥ ३६ ॥

छाया.

ठावा वास तिन्ही जगांसहि तुझा, शैत्यीं न लाभे तुळीं
नान्दे कीर्ति दिगन्ति, ऐक परि मी जें एक सांगें तुला ।

---

१ देशी. २ (उदकरूप) लक्ष्मीचा माद. ३ अगा मेघा. ४ अगा पांथा. ५ जगाचा ताप. ६ उदकाला, श्लेषानें जीवाला. ७ मेघ. ८ [?]कण्यांत. ९ थंडपणाला. १० [illegible]

टाकोनी अति तीव्र, दुःसह, विषज्वाला तुझ्या कोटरीं[1] ।
श्रीखण्डा[2], गुण[3]राशि सुंदर तुझा नाशी द्विजिह्वावली[4] ॥ ३६ ॥

मूल.

नापेक्षा न च दाक्षिण्यं न प्रीतिर्न च संगतिः ।
तथापि हरते तापं लोकानामुन्नतो घनः ॥ ३७ ॥

छाया.

नसे अल्पहि संबंध निजहिताचा
नसे दाक्षिण्य[5] प्रेमभाव साचा ।
नसे संगति ही कधीं दृष्ट झाली
तरी उन्नत[6] घन लोकताप वारी ॥ ३७ ॥

मूल.

समुत्पत्तिः स्वच्छे सरसि हरिहस्ते निवसनं
निवासः पद्मायाः सुरहृदयहारी परिमलः ।
गुणैरेतैरन्यैरपिच ललितस्यांबुज तव
द्विजोत्तंसे हंसे यदि रतिरतीवोन्नतिरियम् ॥ ३८ ॥

छाया.

प्रसन्ना[7] कासारीं[8] जनन[9], हरिहस्तीं निवसन[10],
स्वतां सद्म[11] श्रीचें, परिमळे[12] हरी निर्जरमन[13], ।
तुझ्यामध्यें पद्मा, वसति गुण हे अन्यहि जरी
द्विजोत्तंसी[14] हंसीं रति[15] तरिच अत्युन्नति[16] खरी ॥ ३८ ॥

---

१ पोकळींत. २ अगा चन्दना. ३ गुणांचा समुदाय. ४ सर्प-पंक्ति. ५ ( उदारपणा ) किंवा सरळपणा. ६ थोर. ७ निर्मल. ८ सरोवरांत. ९ जन्म १० वस्ती. ११ घर. स्वतां श्रीचें सद्म (असशी) असा अन्वय. १२ सुगंध. १३ देवांचें मन. १४ पक्षिश्रेष्ठ अशा. १५ प्रेम. १६ फार थोरपणा.

मूल.

साकं ग्रावगणै लुंठंति मणयस्तीरेऽर्कबिंबोपमा
नीरे नीरचरैः समं स भगवान् निद्राति नारायणः ।
एवं वीक्ष्य तवाविवेकमपिच प्रौढिं परामुन्नतेः
किं निन्दान्यथवा स्तवानि कथय क्षीरार्णव त्वामहम् ३९

छाया.

तीरीं लोळति सूर्यबिंबरुचिर[1] ग्रावांसवें[2] सन्मणी[3]
नीरीं[4] निद्रित[5] होय विष्णु भगवान् मीनादिकांच्या[6] गणीं[7] ।
ऐसा हा अविवेक[8] पाहुनि तुझा तेवींच अत्युन्नति[9]
निंदूं मी अथवा स्तवू तुज, सख्या क्षीरार्णवा[10], संप्रति ! ॥ ३९ ॥

मूल.

किं खलु रत्नैरेतैः किंपुनरभ्रायितेन वपुषा ते ।
सलिलमपि यन्नतावकमर्णव वदनं प्रयाति तृषितानाम् ४०

छाया.

उपयोग कायसा या रत्नांचा, जलदतुल्य[11] तनुचाही, ।
कारण, जलहि न जलधे ! उतरे तृषितानननीं[12] तुझें, पाहीं ॥४०॥

मूल.

इयत्यां संपत्तावपि च सलिलानां त्वमधुना
न तृष्णामार्तानां हरसि यदि कासार सहसा ।
निदाघे चण्डांशौ किरति परितोऽङ्गारनिकरं
कृशीभूतः केषामहह परिहर्तासि खलु ताम् ॥ ४१ ॥

---

१ सूर्याच्या बिंबाप्रमाणें सुंदर; हें 'सन्मणी' याचें विशेषण. २ दगडांबरोबर. ३ चांगलीं रत्नें. ४ पाण्यांत. ५ निजलेला. ६ मासे वगैरेच्या. ७ समुदायांत. ८ अविचार. ९ विशेष थोरपणा. १० अगा क्षीरसागरा. ११ मेघासारख्या ( नीलवर्ण ). १२ तान्हेल्या लोकांच्या तोंडांत.

छाया.

तुझ्यापाशीं ऐशी विपुलजललक्ष्मी असुनियां
तडागा, येईना अणुहि तृषितांची तुज दया ! ।
निदाघीं चण्डांशु प्रखरकिरणीं आग पसरी
तदा कां तत्तृष्णा करिशिल, कृशाङ्ग ! वद दुरी ? ॥४१॥

मूल.

अयि रोषमुरीकरोषि नो चेत्
किमपि त्वां प्रति वारिधे वदामः ।
जलदेन तवार्थिना विमुक्ता-
न्यपि तोयानि महान्न हा जहासि ! ॥ ४२ ॥

छाया.

धरिशील मनीं न राग बंधो
तरि वदतों तुज गोष्ट एक *सिंधो ! ।
तव याचक मेघ वारिधारा
वितरी, त्याहि न सोडिशी, उदारा ! ॥ ४२ ॥

मूल.

न वारयामो भवतीं विशन्तीम्
वर्षानदि स्रोतसि जन्हुजायाः ।
न युक्तमेतत्तु पुरो यदस्या-
स्तरङ्गभङ्गान् प्रकटीकरोषि ॥ ४३ ॥

---

१ विपुल जलसंपत्ति. २ अगा सरोवरा. ३ तहानेनें व्याकुल झालेल्या लोकांची. ४ उन्हाळ्यांत. ५ सूर्य. ६ तीव्र उन्हानें. ७ तृषितांची तहान. ८ सुकून गेलें आहे अंग ज्याचें अशा. ९ बंधो सिंधो इ. अन्वय. *अगा समुद्रा. १० (उदकाची) याचना करणारा. ११ पाण्याची वृष्टी. १२ करितो; सोडतो. १३ वारिधारा. १४ टाकतोस. १५ मोकळ्या मनाच्या.

छायां.

भागीरथीच्या शिरसी प्रवाहीं
याच्यांत, वर्षानदि[1], दोष नाहीं।
तिच्या पुढें स्वीय तरङ्गलीला[2]
दार्वांशि हें मान्य न सन्मतीला[3] ॥ ४३ ॥

मूल

पौलोमीपतिकानने विलसतां गीर्वाणभूमीरुहां
येनाघ्रातसमुज्झितानि कुसुमान्याजघ्रिरे निर्जरैः ॥
तस्मिन्नथ मधुव्रते विधिवशान्माध्वीकमाकांक्षति
त्वं चेदञ्चसि लोभमम्बुज तदा किं त्वां प्रति ब्रूमहे ॥४४॥

छाया.

ज्यानें[4] नंदनिं[5] रम्य कल्पकुसुमें[6] हुंगोनिया टाकिलीं[7]
त्यांचा घेउनि गंध निर्जरतती[8] संतोपली अंतरीं।
दैवें तोचि मधुव्रत[9] स्वहृदयीं[10] इच्छीतसे त्वन्मधु[11]
आतां दाविशि, अंबुजा[12]! कृपणता, हीं[13]! काय तूतें वदूं ॥४४॥

मूल.

भुक्ता मृणालपटली भवता निपीता-
न्यंबूनि यत्र नलिनानि निषेवितानि।
रे राजहंस वद तस्य सरोवरस्य
कृत्येन केन भवितासि कृतोपकारः ॥ ४५ ॥

---

१ हे वर्षाकालांतील नादि. २ आपल्या लाटांचा खेळ. ३ साधु लोकांना. ४ ज्या मधुव्रतानें. ५ इंद्राच्या बागेंत. ६ कल्पवृक्षाचीं फुलें. ७ घास घेऊन सोडिलीं. ८ देवांनीं. ९ भ्रमर. १० आपल्या मनांत. ११ तुझा रस. १२ कमला. १३ हाय!

छाया.

त्वां सेविलें मधुर वारि[1], मृणालखण्डें[2]
तेवींच ती रसयुता[3] नलिनी[4] प्रमोदें[5] ।
हंसा ! कसा, मजसि सांग खरेंच, साचा
हा फेडिशील उपकार सरोवराचा ! ॥ ४५ ॥

मूल.

प्रारंभे कुसुमाकरस्य परितो यस्योल्लसन्मञ्जरी-
पुञ्जे मञ्जुलगुञ्जितानि रचयंस्तानातनोरुत्सवान् ।
तस्मिन्नद्यरसालशाखिनि दशां दैवात्कृतामश्नति
त्वं चेन्मुञ्चसि चञ्चरीक विनयं नीचस्त्वदन्योऽस्ति कः॥४६॥

छाया.

येतां[7] रम्य वसन्त, कोमल नव्या यन्मंजरी[8] सेविल्या
गीतें मंजुल गाउनी मंदभरें[9] लीला[10] तुवां दाविल्या ।
दैवें[11] तोचि रसाल[12] दीन सहसा झाला कृशत्वें तया
त्यागीशी, तरि षट्पदा[14] ! तुजपरी तूं धन्य पृथ्वींत या ॥ ४६ ॥

मूल.

एणीगणेषु गुरुगर्वनिमीलिताक्षः
किं कृष्णसार खलु खेलसि काननेऽस्मिन् ।
सीमामिमां कलय भिन्नकरीन्द्रकुम्भ-
मुक्तामयीं हरिविहारवसुंधरायाः ॥ ४७ ॥

---

१ पाणी. २ कमलाच्या देंठांचें तुकडे. ३ रसयुक्त. ४ कमळवेल. ५ मोठ्या आनंदानें. ६ संस्मरणीय. ७ प्राप्त झाला असतां. ८ ज्या आम्रा-च्या मांजिऱ्या. ९ आनंदभरांत. १० चेष्टा, विलास. ११ दुर्दैवानें. १२ आम्रवृक्ष. १३ सोडतोस. १४ भ्रमरा.

छाया.

कां धुंद होउनि मदें, वद, या वनांत
तूं क्रीडनोसि, हरिणा ! हरिणांजनांत ।
वर्षाव[1] येथ दिसतो करि[2]मौक्तिकांचा
क्रीडाप्रदेश[3] इथुनी[4] मृगराज[5]यांचा ॥ ४७ ॥

मूल.

जठरज्वलनज्वलताप्यपगतशङ्कं समागतापि पुरः ।
करिणामरिणा हरिणा हरिणाली हन्यतां नु कथम् ॥४८॥

छाया.

वद[6], आली[7] हरिणाली[8] पुढतीं निःशंक[9], तरि तिला काय ।
मारावें करिरिपुनें[10] ? जरि जठराग्नि[11]प्रदीप्त तत्काय[12] ॥ ४८ ॥

मूल.

येन भिन्नकरिकुंभविस्खलन्-
मौक्तिकावलिभिरञ्चिता मही ।
अद्य तेन हरिणान्तिके कथं
कथ्यतां नु हरिणा पराक्रमः ॥ ४९ ॥

छाया.

मत्त[13]दंतिवरगण्ड भेदुनी
मौक्तिकीं रुचिर[14] केलि मेदिनी[15] ।
आजि त्याचि हरिनें मृगापुढें
वानिजे स्वबल काय बापुडें ! ॥ ४९ ॥

---

१ वृष्टि. २ हत्तींच्या ( गंडस्थळांतील ) मोत्यांचा. ३ विहाराची भूमी, खेळण्याची जागा. ४ या जागेपासून. ५ सिंहाचा. ६ सांग. ७ प्राप्त झाली. ८ हरणांची पंक्ति. ९ निर्भयपणें. १० हत्तींच्या शत्रूनें; अर्थात् सिंहानें. ११ कोठ्यांतील अग्नीनें पेटलेला. १२ त्या सिंहाचा देह. १३ माजलेल्या हस्तिश्रेष्ठाच्या गंडस्थलांनीं. १४ अलंकृत केली. १५ पृथ्वी.

मूल.

स्थितिं नो रे दध्याः क्षणमपि मदान्धेक्षण सखे
गजश्रेणीनाथ त्वमिह जटिलायां वनभुवि ।
असौ कुंभिभ्रान्त्या खरनखरविद्रावितमहा-
गुरुग्रावग्रामः स्वपिति गिरिगर्भे हरिपतिः ॥ ५० ॥

छाया.

गजेन्द्रा[1] ! सोडोनी निबिडें वन हें जा, पळ कसा
न जीवाचा येथें क्षणभरि मदान्धा ! भरंवसा ।
करी[3] मानोनीयां[4] प्रखरनखरीं[5] खण्डित करी
शिलासंघा[6], तो हा मृगपति निजे शैलकुहरीं[7] ॥ ५० ॥

मूल.

गिरिगव्हरेषु गुरुगर्वगुंफितः
गजराजपोत न कदापि संचरेः ।
यदि बुध्यते हरिशिशुस्तनन्धयः
भविता करेणुपरिशेषिता मही ॥ ५१ ॥

छाया.

गर्जराजबाळ[8], न फिरे गुहान्तरीं[9]
गिरिच्या, धरोनि गुरुगर्व[10] अन्तरीं[11] ।
स्तनपायि[12] बाळ[13] हरिचा[14] उठे[15] जरी
करिणीच राहतिल शेष[16] भूवरीं ॥ ५१ ॥

---

१ गजश्रेष्ठा. २ दाट, गर्द. ३ हत्ती. ४ समजून. ५ तीव्र नखांनीं. ६ पाषाणांच्या समुदायाला. ७ पर्वताच्या गुहेंत. ८ अगा गजेंद्राच्या बाळका. ९ गुहांमध्यें. १० मोठा अभिमान. ११ मनांत. १२ आईच्या अंगावरलें दुध पिणारा. १३ बच्चा. १४ सिंहाचा १५ जर झोंपेंतून जागा झाला. १६ बाकी, शिल्लक.

मूल.

निसर्गादारामे तरुकुलसमारोपसुकृती
कृती मालाकारो बकुलमपि कुत्रापि निदधे ।
इदं को जानीते यदयमिह कोणान्तरगतो
जगज्जालं कर्ता कुसुमभरसौरभ्यभरितम् ॥ ५२ ॥

छाया.

तरू लावी बागेमधिं चतुर माळी निजकरीं
तयांमध्यें कोठें तरि बकुल तो स्थापित[1] करी ।
असें कोणा ठावें, वस्तुनि तरु कोणा[2]न्तरिं असा
भरोनी टाकील [3]प्रचुरनिजगंधें दशदिशीं[4] ॥ ५२ ॥

मूल.

यस्मिन् खेलति सर्वतः परिचलत्कल्लोलकोलाहलै-
र्मन्थाद्रिभ्रमणभ्रमं हृदि हरिद्दन्तावलाः पेदिरे ।
सोयं तुङ्गतिमिङ्गिलाङ्गकवलीकारक्रियाकोविदः
क्रोडे क्रीडतु कस्य केलिकलहत्यक्तार्णवो राघवः ॥ ५३ ॥

छाया.

[5]यत्क्रीडासमयीं प्रचण्ड उठती लाटा स[6]मुद्रान्तरीं
[7]तन्नादें गिरि[8]मन्दरभ्रम [9]गमे दिग्वा[10]रणां [11]अन्तरीं ।
[12]लीलेनें गिळि जो तिमिंगिल[13] महान् तो वीर्यवान् [14]राघव
कोठें[15] हो विहरेल के[16]लिकलहें त्यागोनियां[17] अर्णव ॥५३॥

---

१ लावतो. २ कोपऱ्यांत. ३ आपल्या विपुल सुवासानें. ४ दाही दिशा. ५ जो (राघवमत्स्य) क्रीडा करीत असतांना. ६ समुद्रामध्यें ७ लाटांच्या आवाजानें. ८ मन्दरपर्वताचें फिरणें. ९ वाटतो. १० दिग्गजांना. ११ मनांत. १२ सहज. १३ मोठे तिमिंगिल मासे. १४ राघव नांवाचा मासा. १५ कोणत्या शलाशयांत. १६ लाडझगड्यानें. १७ समुद्र सोडून.

मूल.

लूनं मत्तमतंगजैः कियदपि छिन्नं तुषारार्दितैः
शिष्टं ग्रीष्मजभीष्मभानुकिरणैर्भस्मीकृतं काननम् ।
एषा कोणगता मुहुः परिमलैरामोदयन्ती दिशो
हा कष्टं ललिता लवंगलतिका दावाग्निना दह्यते ॥ ५४ ॥

छाया.

कांहीं [1]मत्तमतंगजीं उपटिलें, कांहीं जनीं तोडिलें
[2]वारायास [3]हिमास शेष वन तें [4]चण्डांशुनें जाळिलें ।
राहे एकिकडे परी परिमळें व्यापी दिशामण्डळें
ऐशी ती [5]ललिता [6]लवंगलतिका [7]दावानलानें जळे ॥ ५४ ॥

मूल

स्वर्लोकस्य शिखामणिः सुरतरुग्रामस्य धामाद्भुतं
पौलोमीपुरुहूतयोः परिणतिः पुण्यावलीनामसि ।
सत्यं नंदन किंत्विदं सहृदयैर्नित्यं विधिः प्रार्थ्यते
त्वत्तःखाण्डवरङ्गताण्डवनटो दूरेऽस्तु वैश्वानरः ॥ ५५ ॥

छाया.

[8]स्वर्गालंकृति तूं [9] अपूर्व, [10]अमरद्रूंचें [11]विहारस्थल
इंद्राचें [*]शशिचेंहि, [12]नंदनवना, [13]पुण्यावलीचें फल ।
हें तों सत्य, परंतु नित्य रसिक प्रार्थी विधीला मनीं
राहो [14]खाण्डवरङ्गभूमिनट तो [15] दूरी तुझ्यापासुनी ॥ ५५ ॥

---

१ उन्मत्त हत्तींनीं. २ दूर करण्यास. ३ थंडीला. ४ सूर्यानें. ५ सुंदर. ६ लवंगवेल. ७ वणव्यानें. ८ स्वर्गाचा अलंकार. ९ याला 'असशी' हें अध्याहृत क्रियापद. १० देववृक्षांचें. ११ क्रीडास्थान. *इंद्राच्या बायकोचें. १२ अगा नंदनवना. १३ अनेक पुण्य कृत्यांचें. १४ खाण्डववनरूप रंगभूमीवरील नाचणारें पात्र. १५ पुराणप्रसिद्ध.

मूल.

स्वस्वव्यापृतिमग्नमानसतया मत्तो निवृत्ते जने
चंचूकोटिविपाटितारपुटो यास्याम्यहं पंजरात् ।
एवं कीरवरे मनोरथमयं पीयूषमास्वादय-
त्यन्तः संप्रविवेश वारणकराकारो गजग्रामणीः ॥ ५६ ॥

छाया.

जातां लोक निघोनि दूर अगदीं कार्यार्थ आपापल्या
चंचूनें[1] उखळोनि पंजरमुखा[2] जाईन हिंडावया ।
मांडे खाइ मनांत हे शुकें[3] असे, तों हस्तिशुंडेपरी[4]
काळा भोर भयाण सर्प शिरला तत्पंजराभ्यन्तरीं ॥ ५६ ॥

मूल

रे चाञ्चल्यजुषो मृगाःश्रितनगाः कल्लोलमालाकुला-
मेतामम्बुधिकामिनीं व्यवसिताः संगाहितुं वा कथम् ।
अत्रैवोच्छलदम्बुनिर्भरमहावर्तैः समावर्तितो
यद् ग्रावेव रसातलं पुनरसौ यातो गजग्रामणीः ॥५७॥

छाया.

सांगा, चंचलबुद्धिमूढमृगहो[6] ! अद्रीस[7] या सोडुनी
पोहावें तटिनींत बुद्धि सुचली ऐशी तुह्मां कोठुनी ।
आवर्तान्तरिं सांपडोनि गिरक्या खातां गजांचा पती
गेला पार तळा हिच्या उंपलसा, ऐसें जनीं बोलती ॥५७॥

---

१ चोंचीनें. २ पिंजऱ्याचें तोंड. ३ पोपट. ४ हत्तीच्या सोंडेसारखा. ५ त्या शुकाच्या पिंजऱ्यांत. ६ चंचलबुद्धि आणि ह्मणूनच मूर्ख अशा हरिणांनों. ७ ज्यावर तुमचा निर्भय संचार होता त्या या पर्वताला. ८ नदीमध्यें. ९ भोवऱ्यांत. १० दगड किंवा खडा यासारखा.

मूल.

पिव स्तन्यं पोत त्वमिह मददन्तावलधिया
दृगन्तानाधत्से किमिति हरिदन्तेषु परुषान् ।
त्रयाणां लोकानामपि हृदयतापं परिहर-
न्नयं धीरं धीरं ध्वनति नवनीलो जलधरः ॥ ५८ ॥

छाया.

स्तन प्राशीं प्रेमें प्रचलहरिचाळा, वंद[1] अशीं
दिगन्तीं[2] कोपानें अरुणनयनें[3] कां फिरविशी ।
नव्हे हा उन्मत्त द्विपें[4], सकलसंतापशमन[5]
गड्या, हा गंभीरध्वनि[6] करि नव[7] श्यामल[8] घन[9] ॥ ५८ ॥

मूल.

धीरध्वनिभिरलं ते नीरद मे मासिको गर्भः ।
उन्मदवारणबुद्ध्या मध्ये जठरं समुच्छलति ॥ ५९ ॥

छाया.

गंभीर श्रुतिसुंदर[10] रव[11] तव जलदा[12] पुरे पुरे साचा ।
मत्तकरिभ्रान्तीनें[13] स्फुरतो[14] मम गर्भ एक मासाचा ॥ ५९ ॥

मूल.

वैतण्डगण्डकण्डूतिपाण्डित्यपरिपन्थिना ।
हरिणा हरिणालीषु कथ्यतां कः पराक्रमः ॥ ६० ॥

---

१ सांग. २ दिशांच्या शेवटांकडे. ३ लाल डोळे. ४ हत्ती. ५ सर्व लोकांच्या तापाचें शमन करणारा. हे 'घन' याचें विशेषण. ६ गंभीर आहे शब्द ज्याचा असा. ७ नवीन. ८ काळा. ९ मेघ. १० कर्ण-मनोहर. ११ शब्द, गर्जना. १२ मेघा. १३ माजलेला हत्ती वाटून. १४ स्फुरण पावतो, हालतो, चंचल होतो.

छाया.

गंजगण्डकण्डु[1] ज्यानें खरनखरीं[2] लाविली[3] विनाशपथा ।
सांगावी त्या हरिनें[4] हरिणालीपुढतिं[5] काय वीर्यकथा[6] ॥६० ॥

मूल.

नीरान्निर्मलतो जनिर्मधुरता रामामुखस्पर्धिनी
वासो यस्य हरेः करे परिमलो गीर्वाणचेतोहरः ।
सर्वस्वं तदहो महाकविगिरां कामस्य चाम्भोरुह
त्वं चेत्प्रीतिमुरीकरोषि मधुपे तत् त्वां किमाचक्ष्महे॥६१॥

छाया.

जन्म स्वच्छजलान्तरीं[7], मधुरता[8] रामामुखा[9] लाजवी
वास[10] श्रीहरिच्या करीं, सुरगणां सौगन्ध्य आनंदवी ।
कामाचें[11] कविवाणिचेंहि[12] असशी सर्वस्व[13] अंभोरुहा[14]
ऐसा तूं अतिलुब्ध होशि मधुपीं[15], मोठा चमत्कार हा ! ॥६१॥

मूल.

लीलामुकुलितनयनं किं सुखशयनं समातनुषे ।
परिणामविषमहरिणा करिनायक वर्धते वैरम् ॥ ६२ ॥

छाया.

लीलेनें[16] नयन मिटुनि झोंपशि कां, गजवरा ! सुखभरानें ।
परिणामीं[17] कठिण अशा हरिशीं वैराग्नि वाढतो त्यानें[18] ॥६२॥

---

१ हत्तीच्या गंडस्थलाची खाज. २ तीव्र नखांनीं. ३ जिरविली. ४ सिंहानें. ५ हरिणांच्या पंक्तीपुढें. ६ शौर्याची काहणी. ७ स्वच्छ पाण्यांत. ८ माधुर्य, सौंदर्य. ९ रमणीयस्त्रीमुखाला. १० वस्ती. ११ मदनाचें. १२ कवीच्या भाषेचें. १३ प्राण, जीव. १४ अगा कमला ! १५ भ्रमरावर; श्लेषानें मद्यप्यावर. १६ डौलानें. १७ शेवटीं कठीण. १८ अशा तुझ्या यत्नानें.

मूल.

विदुषां वदनाद्वाचः सहसा यान्ति नो बहिः ।
याताश्चेन्न पराञ्चन्ति द्विरदानां रदा इव ॥ ६३ ॥

छाया.

भलते शब्द न विद्वानांच्या वदनाबाहिर येती ।
आले तर ते हस्तिदन्तसे[1] मार्गे न कधीं जाती ॥ ६३ ॥

मूल.

औदार्यं भुवनत्रयेऽपि विदितं संभूतिरम्भोनिधे-
र्वासो नन्दनकानने परिमलो गीर्वाणचेतोहरः ।
एवं दातृगुरोर्गुणाः सुरतरोः सर्वेऽपि लोकोत्तराः
स्यादर्थिप्रवरार्थितार्पणविधावेको विवेको यदि ॥ ६४ ॥

छाया.

जन्म क्षीरसमुद्रिं, तीन भुवनीं औदार्य ठावें असे,
इंद्राच्या वनि वास[2], गंध हरितो देवांचिही मानसें ।
हे सन्मान्य[3], सुरद्रुमा[4] ! गुण तुझे, वा न्यूनता[5] एक ही
पात्रापात्रविचार[6] दानसमयीं नाहीं तुला अल्पही ॥ ६४ ॥

मूल.

एको विश्वसतां हराम्यपघृणः प्राणानहं प्राणिना-
मित्येवं परिचिन्त्य मा स्म मनसि व्याधानुतापं कृथाः ।
भूपानां भवनेषु किंच विमलक्षेत्रेषु गूढाशयाः
साधूनामरयो वसन्ति कति न त्वत्तुल्यकक्षाः खलाः ६५

१ हत्तीच्या दांतांसारखे. २ वस्ती. ३ थोर लोकांना मान्य. ४ देववृक्षा. ५ उणेपणा. ६ योग्यायोग्य विचार.

छाया.

प्राण्यांना फसवूनि निष्ठुरपणें मी काय तो संहरीं[1]
पश्चात्ताप असा नको करुं, सख्या[2] व्याधा ! कधीं अन्तरीं ।
पुण्यक्षेत्रिं[3] तसा नृपालभवनीं[4] त्वत्तुल्य[5] वा आढळे
मोठा तो खलवृन्द[6], इंगितें[7] जनीं ज्याचें न कोणा कळे ॥६५॥

मूल.

विश्वास्य मधुरवचनैः साधून् ये वंचयन्ति नम्रतराः ।
तानपि दधासि मातःकाश्यपि यातस्तवापि च विवेकः ६६

छाया.

मृदुवचनीं वश करुनी वंचिति[8] सुजनां, तयांहि[9] तनुवरती[10] ।
माते[11] काश्यपि ! धरिसी, चळली मति काय तवहि हर हर ! ती ॥६६॥

मूल.

अन्या जगद्धितमयी मनसः प्रवृत्ति-
रन्यैव काऽपि रचना वचनावलीनाम् ।
लोकोत्तरा च कृतिराकृतिरङ्गहृद्या
विद्यावतां सकलमेव गिरां दवीयः ॥ ६७ ॥

छाया.

लोकोपकारमतिला[12] उपमा[13] न साची[14]
कांहीं विलक्षणचि पद्धति भाषणाची
अत्यद्भुता कृतिहि आकृति फार रम्य
विद्वच्चरित्र सगळें वचनां[15] अगम्य ॥ ६७ ॥

---

१ मारनों. २ अगा पारध्या, ३ पवित्र स्थळांत. ४ राजगृहीं. ५ तुझ्यासारखा. ६ दुष्टांचा समुदाय. ७ मनांतली गोष्ट. ८ फसवितात. ९ त्या खलांत सुद्धां. १० मजीवर. ११ हे धरित्रि माते ! १२ लोकांवर उपकार करण्याच्या बुद्धीला. १३ सादृश्य. १४ योग्य. १५ शब्दांना; अर्थात् वाणीला.

मूल.

आपद्गतः खलु महाशयचक्रवर्ती
विस्तारयत्यकृतपूर्वमुदारभावम् ।
कालागुरुर्दहनमध्यगतः समन्ता-
ल्लोकोत्तरं परिमलं प्रकटीकरोती ॥ ६८ ॥

छाया.

अत्यंत थोर जन दारुण संकटांत
औदार्यवैभव अपूर्वचि दावितात ।
अग्नींत कृष्ण अगरू पडतां, विलोकीं,
लोकोत्तरे प्रकटि तो निजगंध लोकीं ॥ ६८ ॥

मूल.

विश्वाभिरामगुणगौरवगुंफितानां
रोषोऽपि निर्मलधियां रमणीय एव ।
लोकंपृणैः परिमलैः परिपूरितस्य
काश्मीरजस्य कटुतापि नितान्तरम्या ॥ ६९ ॥

छाया.

भुवनसुंदर गुण, बुद्धि विमल ज्याची
कोपवृत्तिहि रम्य त्या पण्डिताची ।
चटक लावी रसिकांस परिमलाची
मधुर कटुताही तशी केशराची ॥ ६९ ॥

---

१ भयंकर. २ काळा चंदन. ३ अलौकिक, असाधारण. ४ आपला वास. ५ जगाला आवडणारे. ६ निर्मल. ७ रागाची वृत्ति. ८ सुगंधाची. ९ गोड, रम्य. १० कडवटपणा. ११ रसिकांस वासाची चटक लावणाऱ्या.

मूल.

लीलालुण्ठितशारदापुरमहासंपद्भराणां पुरो
विद्यासद्मविनिर्गलत्कणमुषो वल्गन्ति चेत् पामराः ।
अद्य श्वः फणिनां शकुन्तशिशवो दन्तावलानां शशाः
सिंहानां च सुखेन मूर्धसु पदं धास्यन्ति शालावृकाः ॥७०॥

छाया.

ज्यांनीं सुंदर रत्नमंडित असें श्रीशारदेचें[1] पुर
[2]लीलेनें लुटिलें तयांसि जनिं कीं धिक्कारिती पामर ? ।
जाणा आज उद्यां जनीं करितिल श्वा[3] बालपक्षी[4] शशे[5]
सौकर्यें[6] हरि[7], नाग[8], वारण[9], अहो! लत्ताप्रहारें वश ॥ ७० ॥

मूल.

गीर्भिर्गुरूणां परुषाक्षराभि-
स्तिरस्कृता यान्ति नरा महत्वम् ।
अलब्धशाणोत्कषणा नृपाणां
न जातु मौलौ मणयो वसन्ति ॥ ७१ ॥

छाया.

नम्रत्वें[10] निजगुरुवाक्प्रहार[11] सोही[12]
तो मोठें पद मिळवी जगांत, पाहीं ।
यत्नानें[13] निकषि[14] न घांसिलें जयास
रत्ना त्या नृपतिशिरीं घडे न वास ॥ ७१ ॥

---

१ भगवती सरस्वतीचें नगर. २ सहज. ३ कुत्रा. ४ पक्ष्यांचें बालक. ५ ससा. ६ सहज. ७ सिंह. ८ सर्प. ९ हत्ती. श्वा, बालपक्षी, शश (अनुक्रमें) हरि, नाग, वारण, यांस लत्ताप्रहारें वश करितील इ. अन्वय. १० नम्रपणानें, गरीबीनें. ११ आपल्या गुरूचे (उपदेशपर) कठोर शब्द. १२ सहन करतो. १३ जोरानें. १४ कसोटीवर.

मूल.

वहाति विषधरान् पटीरजन्मा
शिरसि मषीपटलं दधाति दीपः ।
विधुरपि भजतेतरां कलङ्कम्
पिशुनजनं खलु बिभ्रति क्षितीन्द्राः ॥ ७२ ॥

छाया.

सतत विषधरां पटीरें सेवी
धरि शिरिं दीपक कज्जलास तेवीं ।
वरि तनुवरती कलंक चन्द्र
पिशुनजना गृहिं पाळिती नरेन्द्र ॥ ७२ ॥

मूल.

सत्पूरुषः खलु हिताचरणैरमन्द-
मानन्दयत्यखिललोकमनुक्त एव ।
आराधितः कथय केन करैरुदारै-
रिन्दुर्विकासयति कैरविणीकुलानि ॥ ७३ ॥

छाया.

लोकोपकार करि आपण होउनीच
आजन्मसिद्ध जनिं सज्जनवृत्ति हीच ।
इन्दु प्रफुल्लित करीं करि कैरवांला
हें कार्य काय कथिलें कवणें तयाला ? ॥ ७३ ॥

मूल.

परार्थव्यासंगादुपजहदथस्वार्थपरता-
मभेदैकत्वं यो वहति गुणभूतेषु सततम् ।

---

१ सर्पांना. २ चंदन. ३ दिवा. ४ दुष्ट लोकांना. ५ राजे. ६ जन्मापासून तयार. ७ किरणांनीं. ८ चंद्रविकासी कमलांना.

स्वभावाद्यस्यान्तः स्फुरति ललितोदात्तमहिमा
समर्थो यो नित्यं स जयतितरां कोऽपि पुरुषः ॥७४॥

छाया.

परांचें[1] साधाया हित निजहितातें दवडिती
अभेदाची[2] दृष्टी धरुनि सकलां तुल्य गणिती ।
स्वभावें[3] औदार्य[4]प्रभृति गुण चित्तीं विकसती
विभूती[5] या ऐशा अतुल निजतेजें[6] विलसती ॥ ७४ ॥

मूल.

वंशभवो गुणवानपि सङ्गविशेषेण पूज्यते पुरुषः ।
न हि तुम्बीफलविकलो वीणादण्डः प्रयाति महिमानम् ७५

छाया.

गुणवान्[7] वंशभव[8] हि नर संगविशेषेंचि[9] उच्चता[10] मिळवी ।
तुम्बीफलाविणें[11] त्या वीणादण्डा[12] न थोरली पदवी ॥ ७५ ॥

मूल.

अमितगुणोऽपि पदार्थो दोषेणैकेन निंन्दितो भवति ।
निखिलरसायनमहितो गन्धेनोग्रेण लशुन इव ॥ ७६ ॥

छाया.

होई निन्दाभाजन[13] अमितगुण[14]हि वस्तु[15] एक दोषानें ।
अखिल[16]रसायनपूजित जेवीं तो लशुन[17] उग्रगंधानें[18] ॥ ७६ ॥

---

१ दुसऱ्याचें. २ ऐक्यदृष्टि. ३ साहजिकपणें. ४ उदारपणा वगैरे. ५ अवतारी पुरुष, साधु. ६ आपुल्या अनुपम तेजानें. ७ सद्गुणसंपन्न; पक्षीं दोऱ्यांनीं युक्त. ८ कुलीन; पक्षीं बांबूचे केलेले. ९ विशेष प्रकारच्या संगतीनें; पक्षीं विशेष प्रकारच्या जोडीनें. १० मोटेपणा. ११ भोपळ्या-शिवाय. १२ वीणेच्या लांकडाला. १३ निन्देला पात्र. १४ अनंत गुण आहेत ज्यांत अशी. १५ पदार्थ. १६ सगळ्या रसायनांत मान्य. १७ लसूण. १८ उग्रवासानें.

मूल.

उपकारमेव तनुते विपद्गतः सद्गुणो नितराम् ।
मूर्च्छां गतो मृतो वा निदर्शनं पारदोऽत्र रसः ॥ ७७ ॥

छाया.

होति विपद्[1]ग्रस्त तरी उपकारचि अधिक करिति साधुजन
मूर्च्छित, मृत[2] अथवा तो पारद[3] याचें असे उदाहरण[4] ॥ ७७ ॥

मूल.

वनान्ते खेलन्ती शशकशिशुमालोक्य चकिता
भुजप्रान्तं भर्तुं भजति भयहर्तुः सपदि या ।
अहो सेयं सीता दशवदननीता हलरदैः
परीता रक्षोभिः श्रयति विवशा कामपि दशाम् ॥ ७८ ॥

छाया.

वनीं[5] क्रीडासक्ता[6] शशशिशु[7] बघोनी डचकली
म्हणोनी भर्त्याचे[8] भयहर[9] भुजप्रान्त[10] कवळी ।
अहो ती ही सीता दशवदन[11] नेई पळवुनी
दशा आतां कैशी, हर हर ! तिची राक्षसगणीं[12] ॥ ७८ ॥

मूल.

पुरो गीर्वाणानां निजभुजबलाहोपुरुषिका-
महो कारं कारं पुरभिदि शरं संमुखयतः ।
स्मरस्य स्वर्बालानयनसुखमालार्चनपदं
वपुः सद्यो भालानलभसितजालास्पदमभूत् ॥ ७९ ॥

---

१ संकटांनीं ग्रासलेला. २ हीनबल. ३ मारलेला.; अर्थात् भस्म केलेला. *पारा. ४ दाखला. ५ (येथें) उद्यानांत. ६ खेळण्यांत दंग. ७ सशाचें पिल्लूं. ८ पतीचें. ९ भीति दूर करणारे. १० बाहुप्रदेश. ११ रावण. १२ राक्षसमंडळीमध्यें.

छाया.

अहो ! वारंवार स्वभुजबलदर्पास[1] मिरवी
पुढें[2] गीर्वाणांच्या[3], त्रिपुरमथनीं[4] बाण चढवी ।
अशा त्या कामाची तनु सुरवधूवंद्य[5] सरसा[6]
हराक्षिज्वालेनें[7] कवळिलि, अहा ! आज, सहसा ! ॥७९॥

मूल.

युक्तं सभायां खलु मर्कटानां
शाखास्तरूणां मृदुलासनानि ।
सुभाषितं चीत्कृतिरातिथेयी
दन्तै र्नखाग्रैश्च विपाटितानि ॥ ८० ॥

छाया.

शाखा[8] तरूंच्या मृदु उच्च[9] पीठें[10]
चीत्कार[11] वक्तृत्व रसाळ मोठें ।
आतिथ्य[12] लीला[13] दशनादिकांच्या[14]
सभेंत हें योग्यचि मर्कटांच्या ॥ ८० ॥

मूल.

किं तीर्थं ! हरिपादपद्मभजनं, किं रत्नमच्छामतिः
किं शास्त्रं श्रवणेन यस्य गलति द्वैतान्धकारोदयः ।
किं मित्रं सततोपकाररसिकं तत्वावबोधः सखे
कः शत्रु र्वद खेददानकुशलो दुर्वासनासंचयः ॥८१॥

---

१ आपल्या हातांच्या बळाची प्रौढी. २ समोर. ३ देवांच्या. ४ त्रिपुराला मारणारा जो शिव त्याच्यावर. ५ सुरांगनांना वंदनीय. ६ सुंदर. ७ शिवाच्या (तिसऱ्या) डोळ्यांतील अग्निज्वालेनें. ८ खांद्या. ९ उंच. १० आसनें. ११ चीची असा शब्द. १२ पाहुणचार. १३ चेष्टा. १४ दांत व नखें यांच्या.

छाया.

तीर्थ कशाला ह्मणती ? नारायणपादपद्मभजनाला[1] ।
रत्न कशाला ह्मणती ? निर्मल सन्मान्य बुद्धिविभवाला ॥
शास्त्र असे काय बरें ? यच्छ्रवणें[2] द्वैतें[3] नाशुनी जाय ।
पीडाकुशल[4] रिपु असे कवण ? मनांतिल कुवासनानिचय[5] ॥
उपकारांत रतें[6] असे सतत, असा मित्र होय कोण जनीं ? ।
सत्यज्ञान, जयाच्या लागावें एकसारखें भजनीं ॥ ८१ ॥

मूल.

निष्णातोऽपि च वेदान्ते साधुत्वं नैति दुर्जनः ।
चिरं जलनिधौ मग्नो मैनाक इव मार्दवम् ॥ ८२ ॥

छाया.

वदूनि सगळें वेदान्तशास्त्र नाचे
तरी शुद्ध न मन कधीं दुर्जनाचें ।
जेविं न धरी मैनाक[7] मृदुपणाला
जरी संतत जलधींत मग्न झाला ॥ ८२ ॥

मूल.

नैर्गुण्यमेव साधीयो धिगस्तु गुणगौरवम् ।
शाखिनोऽन्ये विराजन्ते खण्ड्यन्ते चन्दनद्रुमाः ॥८३॥

---

१ नारायणाच्या पादकमळाच्या सेवेला. २ जें ऐकल्यानें. ३ जीवात्मा आणि परमात्मा भिन्न आहेत अशी बुद्धि. ४ त्रास देण्यांत पटाईत. ५ वाईट इच्छांचा समुदाय. ६ रममाण. ७ हिमालयाचा मुलगा. पूर्वी पर्वतांना पंख असत. एके समयीं इन्द्र ते उपटून टाकूं लागला, तेव्हां मैनाक हा त्याच्या भीतीनें समुद्रांत जाऊन लपून राहिला. या पुराणोक्त कथेस अनुलक्षून येथें वर्णन आहे.

छाया.

अधिक वंद्य गमे गुणहीनता
फुकट ती अगदीं गुणपूर्णता ।
इतर सर्वहि वृक्ष विराजती
मलयजा[1] जन खंडुनि टाकिती[2] ॥ ८३ ॥

मूल.

परोपसर्पणानंतचिन्तानलशिखाशतैः ।
अकुंचितान्तःकरणाः साधु जीवन्ति पादपाः ॥८४॥

छाया.

परयाचनचिन्ताग्निज्वालास्पर्शीहि[3] जया नसे ठावा ।
उत्कर्षदुंदुभी[4] त्या तरुचा भुवनांत कां न वाजावा ? ॥ ८४॥

मूल.

शून्येऽपि च गुणवत्तामातन्वानः स्वकीयगुणजालैः ।
विवराणि मुद्रयन् द्रागूर्णायुरिव सज्जनो जयति ॥८५॥

छाया.

शून्यान्तःकरणाला[5] गुणयुत[6] करितो स्वकीय गुणजालीं[7] ।
छिद्रें[8] आच्छादुनियां कोळ्यापरि सुजन विलसतो भारी ॥८५॥

मूल.

खलः सज्जनकार्पासरक्षणैकहुताशनः ।
परदुःखाग्निशमनमारुतः केन वर्ण्यताम् ॥ ८६ ॥

---

१ चन्दनाला. २ तोडतात. ३ दुसऱ्याच्या पुढें हात पसरण्याची चिन्ता तीच कोणी अग्नी, त्या अग्नीच्या ज्वाळांचा स्पर्श. ४ ऐश्वर्याची नौबद. ५ गुणहीन नराला; पक्षीं कोनाला किंवा कोपऱ्याला. ६ सद्गुणी; पक्षीं जाळ्यांनीं युक्त. ७ आपल्या आंगच्या अनेक गुणांनीं; पक्षीं अनंत धाग्यांनीं. ८ व्यंगें; पक्षीं पोकळ जागा.

छाया.

सज्जन[1]कापांसाच्या रक्षणिं अतिदक्ष एकटा[2][3] अनल ।
परंता[4]पाग्निप्रशमनिं अनिळ[5] असा[*] वानि कवण मनुज खळ[6] !॥८६॥

मूल.

परगुह्यगुप्तिनिपुणं गुणमयमखिलैः समीहितं नितराम् ।
ललिताम्बरमिव सज्जनमाखव इव दूषयन्ति खलाः ॥८७॥

छाया.

परगुह्य[7]गोपनांत प्रवीण[8], गुणमय[9], जनां अतीष्ट[10] असे ।
रुचिरांबर[11]तुल्य अशा सुजना खल दूषवीति[12] मूषकसे[13] ॥ ८७ ॥

मूल.

यशःसौरभ्यलशुनः शान्तिशैत्यहुताशनः ।
कारुण्यकुसुमाकाशः खलः सज्जनदुःखदः ॥ ८८ ॥

छाया.

सत्कीर्ति[14]-गन्ध-लशुन, शान्ति[15]हिमानल, दयासुमाकाश[16], ।
खल अत्यद्भुत ऐसा, पीडाकर[17] फार साधु पुरुषास ॥ ८८ ॥

मूल.

धत्ते भरं कुसुमपत्रफलावलीनां
घर्मव्यथां वहति शीतभवां रुजं च ।

---

१ साधुरूप कापसाच्या. २ अद्वितीय. ३ अग्नि. ४ दुसऱ्याचा दुःखरूप अग्नि विझविण्याच्या कामांत. ५ वारा. *हें 'खल' याचें विशेषण. ६ दुष्ट; दुरात्मा. हें 'वानि' याचें कर्म. 'कवण मनुज' हा 'वानि' याचा कर्ता. ७ दुसऱ्याचीं व्यंगें झांकण्यांत; पक्षीं दुसऱ्यांचें गुह्यांग आच्छादण्यामध्यें. ८ निपुण. ९ सद्गुणयुक्त; पक्षीं धाग्यांचें बनलेलें. १० अत्यंत आवडतें. ११ सुंदर वस्त्राप्रमाणें. १२ खराब करितात; बिघडवितात. १३ उंदरासारखे. १४ उत्तमकीर्तिरूप सुवासाला लसूण. १५ सहनशीलतारूप थंडीला विस्तव. १६ दयारूप पुष्पास आकाश. १७ पीडा देणारा.

यो देहमर्पयाति चान्यसुखस्य हेतो-
स्तस्मै वदान्यगुरवे तरवे नमोऽस्तु ॥ ८९ ॥

छाया.

पैत्रप्रसूनफलभारशिरीं धरीशी
शीतातपादिकहि संतत सोशितोसी ।
तूं वेंचिशी परसुखार्थ निजी तनूही
वृक्षा उदारतिलका ! प्रणती तुला ही ! ॥ ८९ ॥

मूल.

हालाहलं खलु पिपासति कौतुकेन
कालानलं परिचुचुंबिषति प्रकामम् ।
व्यालाधिपं च यतते परिरब्धुमद्धा
यो दुर्जनं वशयितुं तनुते मनीषाम् ॥ ९० ॥

छाया.

इच्छा करी प्रलयपावकचुंबनाची
वांच्छा धरी खचित चित्ति हलाहलाची
भेटावयासि करि यत्न भुजंगराया
जो दुर्जनासि वशीं इच्छितसे कराया ॥ ९० ॥

मूल.

दीनानामिह परिहाय शुष्कसस्या-
न्यौदार्यं प्रकटयतो महीधरेषु ।

---

१ पानें, फुलें आणि फळें यांचें ओझें. २ थंडी, ऊन वगैरे. ३ अर्पण करितोस; खर्च करितोस. ४ आपली. ५ उदार जनामध्यें श्रेष्ठा. ६ नमस्कार. ७ प्रलयकाळच्या अग्नीला आलिंगन देण्याची. ८ हालाहल विष पिण्याची. ९ सर्पश्रेष्ठ तक्षकाला (भेटावयासि). १० वश कराया इ. अन्वय.

औन्नत्यं परममवाप्य दुर्मदस्य
ज्ञातोऽयं जलधर तावको विवेकः ॥ ९१ ॥

छाया.

क्षेत्रें[1] हीं किति तरि शुष्क[2] जागजागीं
औदार्य प्रकट करीशि शैलशृंगीं[3] ।
पावोनी पद बहु उंच, माद आला
अंम्भोदा[4], ह्मणुनि विवेक[5] कार्य[6] गेला ! ॥ ९१ ॥

मूल.

गिरयो गुरवस्तेभ्योऽप्युर्वी गुर्वी ततोऽपि जगदण्डम् ।
तस्मादप्यतिगुरवः प्रलयेऽप्यचला महात्मानः ॥ ९२ ॥

छाया.

गिरि मोठे, त्यापेक्षां पृथिवी, तिजहून विश्व हें सगळें ।
त्यापरिसही महात्मे, यद्बुद्धि प्रलयकाळि ही न ढळे ॥ ९२ ॥

मूल.

व्योमनि वासं कुरुते चित्रं निर्माति यत्नतः सलिले ।
स्नपयति पवनं सलिलै र्यस्तु खले चरति सत्कारम् ॥ ९३ ॥

छाया.

वाँस[7] करी आकाशीं; यत्नें करि सलिलिं[8] चित्र निर्माण[9] ।
न्हाणी[10] पवनीं[11] सलिलें, जो नर दावी खलीसि[12] बहुमान ॥ ९३ ॥

मूल.

हारं वक्षसि केनाऽपि दत्तमज्ञेन मर्कटः ।
लेढि जिघ्रति संक्षिप्य करोत्युन्नतमासनम् ॥ ९४ ॥

---

१ शेतं. २ वाळलेलीं. ३ डोंगराच्या शिखरावर. ४ अगा मेघा ! ५ विचारशक्ति. ६ विवेक गेला काय ? असा अन्वय. ७ वस्ती. ८. पाण्यावर. ९ निर्माण करि इत्यादि अन्वय. १० स्नान घालतो. ११ वाऱ्याला. १२ दुष्ट माणसाला.

छाया.

कोणा एका मूढें वानरकंठिं अर्पिला हार ।
चाटुनि हुंगुनि करि तो[1] त्याचें आसन[2] उन्नत[3] फार ॥ ९४ ॥

मूल.

मलिनेऽपि रागपूर्णां विकसितवदनामनल्पजल्पेऽपि ।
त्वयि चपलेऽपि च सरसां भ्रमर कथं वा सरोजिनीं त्यजसि ९५

छाया.

बहुभाप[4], मलिन[5], चपल[6]हि असतां तूं, ही सरोजिनी[7], भ्रमरा[8] ।
फुल्लमुखी[9], रंगयुता[10], सरसा[11] तुजशीं[12]; त्यजीशि कां तिजला ? ॥ ९५ ॥

मूल.

स्वार्थं धनानि धनिकात् प्रतिगृण्हतो य-
दास्यं भजेन्मलिनतां किमिदं विचित्रम् ।
गृण्हन् परार्थमपि वारिनिधेः पयोऽपि
मेघोऽयमेति सकलः किल कालिमानम् ॥ ९६ ॥

छाया.

जो स्वोदरार्थ[13] उसनें धन घेउं लागे
त्याच्या मुखास जनिं थोर कलंक लागे ।
आश्चर्य यांत न; परार्थ[14] समुद्र[15] यांची[16]
काळी समग्र तनु होय तयां[17] घनाची ॥ ९६ ॥

---

१ वानर. २ बैठक. ३ उंच. ४ पुष्कळ गुंजारव करणारा; पक्षीं कठोर भाषण करणारा. ५ कृष्णवर्ण; पक्षीं दुराचारी. ६ चंचळ; पक्षीं एके ठिकाणीं प्रेम न करणारा. ७ कमळवेल. ८ अगा भ्रमरा ! ९ फुललीं आहेत कमळरूप मुखें जिचीं, पक्षीं हसतमुख. १० रक्तवर्णयुक्त; पक्षीं अभिलाषयुक्त. ११ मकरन्दयुक्त; पक्षीं प्रेमयुक्त. १२ तुझ्याबरोबर वागण्यांत. १३ आपल्या पोटाकरितां. १४ दुसऱ्याकरितां, लोकाकरितां. १५ हें 'याची' याचें कर्म. १६ मारतो. याचा 'जो' (घन) हा अध्याहृत कर्ता होय. १७ त्या मेघाची.

मूल.

जनकः सानुविशेषो जातिः काष्टं भुजंगमैः सङ्गः ।
स्वगुणैरेव पटीरज यातोऽसि तथापि महिमानम् ॥ १७ ॥

छाया.

अद्रिविशेष[1] पिता तव, सर्पांशीं संग, काष्ठ ही जाति ।
स्वगुणांनींच तरी त्वां मेळविली, चन्दना ! जनीं महती[2] ॥ १७ ॥

मूल.

कस्मै हन्त फलाय सज्जन गुणग्रामार्जने सज्जसि
स्वात्मोपस्करणाय चेन्मम वचः पथ्यं समाकर्णय ।
ये भावा हृदयं हरन्ति नितरां शोभाभरैःसंभृता-
स्तैरेवास्य कलेः कलेवरपुषो दैनंदिनं वर्तनम् ॥ १८ ॥

छाया.

वांछोनी[3] कवण्या फळास, सुजना ! विद्यार्जना लागसी,
स्वात्मालंकरणार्थ[4] ! साठविं तरी सद्बोध[5] हा मानसीं ।
सौंदर्यातिशयें[6] मनास हॅरिती[7] तत्काल पृथ्वीतळीं
त्या वस्तूंवरतीच वृत्ति करितो हा देहपोषी[8] कली ॥ १८ ॥

मूल.

धूमायिता दश दिशो दलितारविन्दा
देहं दहंति पवना इव गंधवाहाः ।
त्वामन्तरेण मृदुताम्रदलाम्रमञ्जु-
गुञ्जन्मधुव्रत मधो किल कोकिलस्य ॥ १९ ॥

---

१ मलय पर्वत. २ मोठेपणा. ३ इच्छा करून. ४ आपणांस अलंकृत करण्याकरितां. ५ सदुपदेश; चांगली गोष्ट. ६ सौन्दर्यभरानें. ७ याला 'ज्या' (वस्तु) हा अध्याहृत कर्ता. ८ (आपलें) शरीर पोसणारा.

छाया.

रसालतरुवरि मंजुळ गाती भृंगसंघ ज्यांमाजी
अशा तुजविणें, सख्या वसन्ता ! कोकिल दुःखित आजी ।
प्रफुल्लकमलीं पूर्ण दशदिशा धूसर गमति तयाला
सुगंध पवनहि अंगारापरि तापप्रद बहु झाला ॥ ९९ ॥

मूल.

भिन्ना महागिरिशिलाः करजाग्रजाग्र-
दुद्दामशौर्यनिकरैः करटिभ्रमेण ।
दैवे पराचि करिणामरिणा तथापि
कुत्रापि नापि खलु हा पिशितस्य लेशः ॥१००॥

छाया.

वांटोनी मनिं गजराज तुंगगंड
खंडी जो खरनखरीं शिला प्रचण्ड ।
त्या सिंहावरि विपरीत काळ आला
मांसाचा कवलहि त्या महाग झाला ! ॥ १०० ॥

मूल.

गर्जितमाकर्ण्य मनागङ्के मातु र्निशार्धजातोऽपि ।
हरिशिशुरुत्पतितुं द्रागङ्गान्याकुञ्च्य लीयते निभृतम् १०१

छाया.

परिसुनि गर्जित किंचित् हरिशिशु रात्र्यर्धजात तरि पाहे ।
उड्डुनार्थ स्वांगीं आकर्पुनि अंकिं जननिच्या राहे ॥ १०१ ॥

---

१ आंब्यावर. २ भुंग्यांच्या झुंडी. ३ ज्या वसंतांत. ४ फुललेल्या कमळांनीं. ५ धुरकट, मलिन. ६ समजून. ७ उंच आहे गंडस्थळ ज्याचें असा. हें 'गजराज' यांचें विशेषण. ८ जो सिंह. ९ तीव्र नखांनीं. १० गर्जना. ११ थोडेसें; अस्पष्ट. १२ सिंहाचा बालक. १३ ज्याला जन्मून अर्धी रात्र झाली आहे असा. १४ उडी मारण्याला. १५ आपल्या अवयवांना. १६ आवरून धरून. १७ मांडीवर. १८ पडून राहतो.

# शृंगारविलास.

मूल.

न मनागपि राहुरोषशंका
न कलंकानुगमो न पाण्डुभावः ।
उपचीयत एव काऽपि शोभा
परितो भामिनि ! ते मुखस्य नित्यम् ॥ १ ॥

छाया.

अणुहि न मनिं राहुरोपशंका
धरि नचि पांडुरता तशी कलङ्का ।
अशि तव वदनद्युति प्रकाशे
सतत, न भामिनि! तीस साम्य भासे ॥ १ ॥

मूल.

नितरां परुषा सरोजमाला
न मृणालानि विचारपेशलानि ।
यदि कोमलता तवाङ्गकाना-
मथ का नाम कथापि पल्लवानाम् ॥ २ ॥

छाया.

अतिशयित कठोर अब्जमाला
बिसतंति रम्य न वाटते मनाला ।

---

१ राहूच्या रागाची भीति. २ याला 'जी' (वदनद्युति) हा अध्याहृत कर्ता. याचीं कर्में 'राहुरोपशंका,' 'पाण्डुरता,' आणि 'कलंका,' हीं होत. ३ फिकटपणा. ४ मुखाची कान्ति. ५ विशेष फाकत जाते.* हे प्रिये भामिनि. ६ तुलना. ७ दिसते. ८ कमलांची पंक्ति. ९ कमलांच्या देंठां-च्या पत्तिका.

मुळिंच न मग गोष्ट पल्लवांची[1]
मृदु[2]गुणकीर्ति अशी तवाङ्गकांची[3] ॥ २ ॥

मूल.

स्वेदाम्बुसान्द्रकणशालिकपोलपाली-
दोलायितश्रवणकुण्डलवन्दनीया ।
आनन्दमंकुरयति स्मरणेन काऽपि
रम्या दशा मनसि मे मदिरेक्षणायाः ॥ ३ ॥

छाया.

स्वेदांबुनें[4] रुचिर[5] फार कपोल[6] झाले
त्यांच्यावरी श्रवणकुण्डलयुग्म[7] हाले ।
येतां अशी स्मृतिपथाप्रति[8] सुंदरांगी[9]
आनंद अंकुरित[10] होय मदन्तरंगीं[11] ॥ ३ ॥

मूल.

कस्तूरिकातिलकमालि विधाय सायं
स्मेरानना सपदि शीलय सौधमौलिम् ।
प्रौढिं भजन्तु कुमुदानि मुदामुदारा-
मुल्लासयन्तु परितो हरितो मुखानि ॥ ४ ॥

छाया.

मृगमदतिलकातें[12] लावुनीयां कपाळीं
स्मितवदन[13] दिनांतीं[14] बैस तूं सौधजालीं[15] ।
प्रियसखि ! कुमुदांना[16] थोर आनंद वाटो
चहुंकडुनि दिशांच्या ओननीं[17] मोद[18] दाटो ॥ ४ ॥

---

१ पाल्याची. २ मृदुपणाचा लौकिक. ३ तुझ्या मृदु अवयवांची. ४ घर्मोदकानें. ५ सुंदर. ६ गाल. ७ कर्णकुण्डलाची जोडी. ८ स्मृतींत. स्मरणांत. ९ प्रिया. १० उत्पन्न. ११ माझ्या चित्तांत. १२ कस्तूरीतिलकाला, १३ हसतमुख. १४ संध्याकाळीं. १५ [illegible] खिडकींत. १६ चंद्रविकासी कमलांना. १७ मुखांचे ठायीं. १८ आनंद, टवटवी.

मूल.

तन्मंजु मन्दहसितं श्वसितानि तानि
सा वै कलङ्कविधुरा मधुराननश्रीः ।
अद्यापि मे हृदयमुन्मदयन्ति हन्त
सायंतनाम्बुजसहोदरलोचनायाः ॥ ५ ॥

छाया.

मंजुळ आणिक मन्द हास्य तें, ते सुसकारे मोठे
ती वदनश्री[1] मधुर[2], जीवरी कलंक न दिसे कोठें ।
मनास अजुनी वेड लाविती विलास[3] हे दयितेचे[4]
सायंकाळीं फुलतीं कमळें तत्सम नेत्र जयेचे ॥ ५ ॥

मूल.

प्रातस्तरां प्रणमने विहिते गुरूणा-
माकर्ण्य वाचममलां भव पुत्रिणीति ।
नेदीयसि प्रियतमे परमप्रमोद-
पूर्णादरं दयितया दधिरे दृगन्ताः ॥ ६ ॥

छाया.

प्रातःकाळीं गुरुजनचरणां वंदन करितां त्यांनीं[5]
'पुत्रवती हो,' अशी काढिली मंगलदायक वाणी ।
परिसुनियां ती परमप्रेमें तेविंच मोदभरानें
निकटवर्ती[6] पतिवरी सोडिली कटाक्षालि[7] दयितेनें ॥ ६ ॥

मूल.

गुरुजनभयमद्विलोकनान्तः-
समुदयदाकुलभावमावहन्त्याः ।

१ मुखाची शोभा. २ सुंदर. ३ शृंगारात्मक चेष्टा. ४ प्रियेचे. ५ गुरुजनांनीं. ६ जवळ असलेल्या. ७ कटाक्षपंक्ति.

दरदलदरविन्दसुन्दरं हा
हरिणदृशो नयनं न विस्मरामि ॥ ७ ॥

छाया.

फेकितांना मजवरी कटाक्षांस
होय गुरुजनसंकोच यन्मनास ।
मृगाक्षीचे त्या नयन विस्मरें ना
असे ईषत्फुल्लाब्जसाम्य ज्यांनी ॥ ७ ॥

मूल.

कपोलपालिं तव तन्वि मन्ये
लावणधन्ये दिशमुत्तराख्याम् ।
विभाति यस्यां ललितालकायां
मनोहरा वैश्रवणस्य लक्ष्मीः ॥ ८ ॥

छाया.

कपोलपाली तन्वि ! तुझी ही उत्तरदिशाचि वाटे
सुंदरालका असुनि तिच्यामधिं वैश्रवणश्री थाटे ॥ ८ ॥

मूल.

आलीषु केलीरभसेन बाला
मुहुर्ममालापमुपालपन्ती ।
आरादुपाकर्ण्य गिरं मदीयां
सौदामिनीयां सुषमामयासीत् ॥ ९ ॥

---

१ वडील माणसांची लाज. २ जिच्या मनाला. ३ विसरत नाहीं. ह्याचें 'नयन' हें कर्म आणि 'मी' हा अध्याहृत कर्ता. ४ किंचित् फुललेल्या कमलाची शोभा. ५ ज्या नयनांना. ६. गंडप्रदेश, गाल. ७ हे कृशाङ्गि ! ८ सुंदर केश कुटिल ( लोंबत ) आहेत जिच्यावर अशी; पक्षीं सुंदर अलकानगरी आहे जिच्यांत अशी. ९ वै=खरोखर, श्रवणश्री=कर्णशोभा; पक्षीं कुबेराची लक्ष्मी.

छाया.

सखीसमाजांत विहाररंगीं
आलाप माझे वदतां वरांगी ।
ऐकोनियां सन्निध शब्द माझा
विद्युल्लतेच्या धरि थोर तेजा ॥ ९ ॥

मूल.

मुधैव मन्तुं परिकल्प्य गन्तुं
मृषैव रोषादुपजल्पतो मे ।
उदश्रुचञ्चन्नयनं नताङ्गी
गिरं न कां कामुररीचकार ॥ १० ॥

छाया.

'हा चाललों इथुनि भामिनि ! अन्यधामीं'
दावोनि कोप लटिका वदतों असें मी ।
तों आणुनी उदकें कंपित लोचनांला
ती[१२] काय काय वचनें वदली न बाला ? ॥ १० ॥

मूल.

तदवधि कुशली पुराणशास्त्र-
स्मृतिशतचारुविचारजो विवेकः ।
यदवधि न पदं दधाति चित्ते
हरिणकिशोरदृशो दृशो विलासः ॥ ११ ॥

---

१ मैत्रिणींच्या मंडळींत. २ क्रीडेच्या भरांत. ३ भाषण, शब्द. ४ बोलत असतां. ५ सुंदरांगी; सुंदरी. ६ विजेच्या. ७ कांतीला. विद्युल्लतेच्या थोर तेजा धरि' असा अन्वय. ८ दुसरीकडे. ९ इतक्यांत. असें मी वदतों तों इ. अन्वय. १० अश्रु, आसवें. ११ कंपयुक्त. १२ 'ती बाला काय काय वचनें न वदली !' असा अन्वय.

छाया.

शास्त्रपुराणग्रंथान्तरिंच्या चालति तोंवरि गोष्टी !
कुरङ्गनयनानयनविलास[1] न जोंवरि पडला दृष्टी ॥ ११ ॥

मूल

आगतः पतिरितीरितं जनैः
शृण्वती चकितमेत्य देहलीम् ।
कौमुदीव शिशिरीकरिष्यते
लोचने मम कदा मृगेक्षणा ॥ १२ ॥

छाया.

पातला[2] प्रिय[3] गृहास, ऐकुनी[4]
संभ्रमें[5] पुढति येइ[6] तत्क्षणीं ।
चंद्रिकेपरि[7] कधीं मृगेक्षणा[8]
शांतवील[9] मम लोलें[10] लोचनां ॥ १२ ॥

मूल.

अवधौ दिवसावसानकाले
भवनद्वारि विलोचने दधाना ।
अवलोक्य समागतं तदा मा-
मथ रामा विकसन्मुखी बभूव ॥ १३ ॥

छाया.

निशिं[11] आगमनप्रसंगिं[12] जाया[13]
बसली द्वारिं[14] निजाक्षि[15] लावुनीयां ।

---

१ हरिणाक्षीच्या डोळ्यांचा विलास. २ आला. ३ पति. ४ 'प्रिय गृहास पातला ' हें याचें कर्म. ५ लगबगीनें. ६ समोर येई. ७ चांदण्याप्रमाणें. ८ हरिणलोचना, प्रिया. ९ शांत करील. १० चंचल अथवा उत्कंठित नयनांना. ११ संध्याकाळीं; रात्रीं. १२ (माझ्या) आगमनाच्या वेळीं १३ नायका. १४ (मंदिराच्या) दाराकडे. १५ आपले डोळे लावून.

बघुनी मज पातला[1] गृहाला
प्रियरामावदना[2] विकास आला ॥ १३ ॥

मूल.

गुरुभिः परिवेष्ठितापि गण्ड-
स्थलकण्डूयनचारुकैतवेन ।
दरदर्शितहेमबाहुनाला
मयि बाला नयनाञ्चलं चकार ॥ १४ ॥

छाया.

गुरुजन[4] भवतीं[5] असोनि बाला[6]
करुनि कपोलजकण्डुच्या[7] मिषाला[8] ।
प्रकटवि[9] भुजकांचनाब्जनाला[10]
मजवरि सोडि पुढें अपांगमाला[11] ॥ १४ ॥

मूल.

विनये नयनारुणप्रसाराः
प्रणतौ हन्त निरन्तराश्रुधाराः ।
अयि जीवितसंशयः प्रयाणे
न हि जाने हरिणाक्षि केन तुष्येः ॥ १५ ॥

छाया.

विनयें[12] तव नेत्र रक्त होती
नमनें[13] त्यांतुनि अश्रु लोटताती ।

---

१ आलेला. २ आवडत्या प्रियेच्या मुखावर. ३ टवटवी. ४ वडील माणसें. ५ सभोंवतीं. ६ प्रिया. ७ गालावर उत्पन्न झालेल्या कंडूच्या. ८ निमित्ताला. ९ दाखवी. १० बाहुरूप सुवर्णकमळाच्या देंठाला. ११ नेत्रकटाक्षांच्या पंक्तीला. १२ (मी) नम्र झालों असतां. १३ (मी) प्रणिपात केला असतां. * त्या नेत्रांतून.

तव जीवित जाइल प्रयाणें[1]
न कळे तोषेसि[2] तुं, प्रिये ! कशानें[3] ! ॥ १५ ॥

मूलं.

अकरुण मृषाभाषासिन्धो विमुञ्च ममाञ्चलं
तव परिचितः स्नेहः सम्यङ्मयेत्यभिधायिनीम् ।
अविरलगलद्बाष्पां तन्वीं निरस्तविभूषणां
क इव भवतीं भद्रे निद्रे विना विनिवेदयेत् ॥ १६ ॥

छाया.

करुणाहीना[4] ! महावंचका[5] ! त्यजि[6] अंचलं[7] मम, कान्ता !
प्रेमाची तव ओळख पटली फार चांगली आतां ॥
ऐसें बोलुनि खळखळ पाणी नयनांतुनि जी ढाळी
सुकोनि गेली, अलंकारही नचि अंगावरि घाली ॥
अशी असे मम दयिता[8] प्रियंकर[9] पंचप्राणांहून
सखये निद्रे! तुजविण तिजशीं संगम[10] घडविल कोण ? ॥१६॥

मूल.

तीरे तरुण्या वदनं सहासं
नीरे सरोजं च मिलद्विकासम् ।
आलोक्य धावत्युभयत्र मुग्धा
मरन्दलुब्धालिकिशोरमाला ॥ १७ ॥

---

१ (माझ्या) दूर जाण्यानें किंवा वियोगानें. २ संतुष्ट होशील. ३ कोणत्या उपायानें. ४ निष्करुणा, निर्दया. ५ महान् कपट्या. ६ सोड. ७ पदर. ८ प्रिया. ९ आवडती. १० भेट.

छाया.

तीरीं बघोनि[1] तरुणीमुख[2] रम्यहास[3]
नीरीं[4] सरोज,[5] विलसे बहु यद्विकास[6] ।
दोन्हीकडे[7] अलिकिशोरकसंघ[8] मुग्ध[9]
धांवोनि जाति सहसा[10] मकरन्दलुब्ध[11] ! ॥ १७ ॥

मूल.

वीक्ष्य वक्षसि विपक्षकामिनी-
हारलक्ष्म दयितस्य भामिनी ।
अंसदेशविनिवेशितां क्षणा-
दाचकर्ष निजबाहुवल्लरीम् ॥ १८ ॥

छाया.

दयितहृदयीं[12] परकीयकामिनीहारचिन्ह[13] पाहोनी ।
अंसार्पित[14] भुजलता[15] भामिनी[16] घे तत्क्षणिं काढोनी ॥१८॥

मूल.

हृदये कृतशैवलानुषंगा
मुहुरङ्गानि यतस्ततः क्षिपन्ती ।
प्रियनामपरे मुखे सखीना-
मतिदीनामियमादधाति दृष्टिम् ॥ १९ ॥

---

१ याचें कर्म 'तरुणीमुख,' व 'सरोज.' २ तरुणस्त्रीचें मुख. ३ मधुर आहे हास्य ज्यांत असें. ४ पाण्यांत. ५ कमल. ६ ज्या-(सरोजा-)चा प्रफुल्लितपणा. ७ 'तरुणीमुख,' व 'सरोज' यांच्याकडे. ८ बालभ्रमरांचे थवे. ९ अज्ञान, वेडे. १० अविचारानें. ११ रसप्राशनार्थ लोलुप झालेले. १२ प्रियाच्या वक्षःस्थलावर. १३ सपत्नीच्या किंवा सवतीच्या हाराची खूण. १४ गळ्यांत घातलेली. १५ बाहुरूप वेल. १६ भामिनी स्त्री.

छाया.

हृदयावरि लावि शैवलातें[1]
भंवतीं[2] चाळवि[3] सुंदरी[4] तनूतें[5] ।
प्रियनाम[6] सखीमुखांत[7] येई
तइं तद्दृष्टि[8] नितांत[9] दीन होई ! ॥ १९ ॥

मूल.

इत एव निजालयं गताया
वनिताया गुरुभिः समावृतायाः ।
परिवर्तितकन्धरं नतभ्रु
स्मयमानं वदनाम्बुजं स्मरामि ॥ २० ॥

छाया.

हरिणनयना[10] इथुनीच गृहा गेली
भोंवतालीं गुरुजनीं[11] वेष्टिलेली ।
मान मुरडे, भृकुटीहि[12] नम्र होई
असें स्मितयुत[13] तद्वदन[14] मनीं[15] येई ॥ २० ॥

मूल.

कथय कथमिवाशा जायतां जीविते मे
मलयभुजगवान्ता वान्ति वाताः कृतान्ताः ।
अयमपि खलु गुञ्जन् मञ्जु माकन्दमौलौ
चुलुकयति मदीयां चेतनां चञ्चरीकः ॥ २१ ॥

---

१ शेवाळें. २ इकडे तिकडे. ३ टाकी. ४ प्रिया. ५ अंगाला. ६ पतीचें नांव. ७ मैत्रिणीच्या तोंडांत. ८ सुंदरीची दृष्टि. ९ अत्यंत. १० मृगाक्षी, प्रिया. ११ वडील माणसांनीं. १२ भिवई. १३ मंदहास्ययुक्त. १४ त्या प्रियेचें मुख. १५ मनांत येणें.

छाया.

कुट्टनि मजसि आतां यापुढें जीविताशा ?
मलय[1]भुजगवायु व्यापिती या प्रदेशा ।
सखि[2] ! मधुकर[3]ही हा गाउनी मंजु[4]गीतें
विकसित[5]सहकारीं, क्षोभवी मन्म[6]तीतें ॥ २१ ॥

मूल.

निरुध्य यान्तीं तरसा कपोतीं
कूजत्कपोतस्य पुरो दधाने ।
मयि स्मिताङ्कं वदनारविन्दं
सा मन्दमन्दं नमयांबभूव ॥ २२ ॥

छाया.

कपोत[7]कान्ता पळतां धरोनी
कान्ता[*]पुढें[8] ठेविं उभी करोनी ।
बघोनियां हें, वदना[9]रविन्द
प्राणप्रिया वांकवि मंद मंद ॥ २२ ॥

मूल.

तिमिरं हरन्ति हरितां पुरःस्थितं
तिरयंति तापमथ तापशालिनाम् ।
वदनत्विषस्तव चकोरलोचने
परिमुद्रयन्ति सरसीरुहश्रियः ॥ २३ ॥

---

१ मलयपर्वतावरील सर्पांनीं आपल्या मुखांतून सोडलेले वायु. २ अगे मैत्रिणी. ३ भ्रमर सुद्धां. ४ गोड गाणीं. ५ प्रफुल्ल आम्रवृक्षावर. ६ माझ्या मनाला. ७ कपोतीला. ८ कपोतापुढें. * याला 'मी' हा अध्याहृत कर्ता. ९ मुखकमल. 'प्राणप्रिया वदनारविंद मंद मंद वांकवी,' असा अन्वय.

छाया.

वदनकान्ति तुझी मृगलोचने
अखिल[1] दिक्[2]तम हें * विलयास[3] ने ।
शम[4]वि तप्त[5]जनाप्रति सत्वरीं
कमलकांतिस लज्जितही करी ॥ २३ ॥

मूल.

लवलीं तव लीलया कपोले
कवलीकुर्वति कोमलात्विषा ।
परिपाण्डुरपुण्डरीकखण्डे
परिपेतुः परितो महाधयः ॥ २४ ॥

छाया.

प्रिये ! कोमल तव गंड[6] कान्ति[7]खाणी
सहज लवली[8]वेलीस लाज आणी ।
पाहुनीयां हें शुभ्र[9]कमलखण्ड—
मनीं चिन्ता[10]नल भडकला प्रचण्ड ॥ २४ ॥

मूल.

यौवनोद्गमनितान्तशंकिताः
शीलशौर्यबलकान्तिलोभिताः ।
संकुचन्ति विकसन्ति राघवे
जानकीनयननीरजश्रियः ॥ २५ ॥

---

१ सर्व. २ दिशांतील अंधकार * पुढें दिसणारें. ३ नाहींसे करितें. ४ शांत करी. ५ संताप पावलेल्या जनांस. ६ गाल. ७ अतिसुंदर. ८ लवली नांवाच्या वेलीला. ९ पांढऱ्या कमळांच्या समुदायाच्या मनांत. १० चिंताग्नि.

छाया.

शील, शौर्य, बल, अशा गुणांनीं अंतरिं मोहुनि गेली
तारुण्याच्या मधुरकान्तिनें फाराचि लज्जित झाली ॥
ऐशी सीतानयनाब्जश्री[1] पाहुनि रघुरायाला
धारण करिते उल्लासातें[2] तेविंच संकोचाला ॥ २५ ॥

मूल.

अधिरोप्य हरस्य हन्त चापं
परितापं प्रशमय्य बान्धवानाम् ।
परिणेष्यति वा न वा युवायं
निरपायं मिथिलाधिनाथपुत्रीम् ॥ २६ ॥

छाया.

गुणंयुक्त[3] करोनि ईशचापा[4]
शमवोनी निजबान्धवालितापा[5] ।
वरि[6], वा[7] न, कुमार[8] कोण जाणे
मिथिलानायकनंदिनी[9] सुखानें ॥ २६ ॥

मूल.

उपनिषदः परिपीता गीताऽपि च हन्त मतिपथं नीता ।
तदपि न हा विधुवदना मानससदनाद्बहिर्याति ॥२७॥

छाया.

उपनिषदर्थपरिग्रह[10] झाला, गीताहि मतिपंथा[11] जाय ।
परि जाय न विधुवदना[12] मानससदनासि[13] सोडुनी, हाय ! ॥२७॥

---

१ सीतेच्या नयनकमलाची लक्ष्मी. २ विकासाला. ३ दोरीनें युक्त. ४ शिवधनुष्याला. ५ आपल्या बांधवसमुदायाच्या चिंतेला. ६ वरतो. ७ किंवा. ८ रामचंद्र. ९ जनककुमारी, जानकी. हें 'वरि' याचें कर्म. १० उपनिषदांतील अर्थांचें ग्रहण. ११ ध्यानमार्गाला. १२ चंद्रमुखी; प्रिया. १३ मनोरूप गृहाला.

मूल.

लोभाद्वराटिकानां विक्रेतुं तक्रमानिशमटन्त्याः ।
लब्धो गोपकिशोर्या मध्येरथ्यं महेंद्रनीलमणिः ॥ २८ ॥

छाया.

लोभें [1]कपर्दिकांच्या सं[2]ध्यावधि त[3]क्रविक्रयार्थ फिरे ।
त्या गोपकुमारीला मार्गीं मणि [4]नीळ थोर सहज मिळे! ॥ २८ ॥

मूल.

रूपारुचिं निरसितुं रसयन्त्या हरिमुखस्य लावण्यम् ।
सुदृशः शिव शिव सकले जाता सकलेवरे जगत्यरुचिः २९

छाया.

रूपा[5]रुचि दूर[6] व्हाया हरिमुं[7]खलावण्यसेवनीं रमली ।
तों[8], हर हर! प्रियेची स[9]कलेवरभुवनभक्ति मावळली! ॥ २९ ॥

मूल.

किं जल्पसि मुग्धतया हन्त ममाङ्गं सुवर्णवर्णमिति ।
तद्यदि पतति हुताशे तदा हताशे तुलां तवारोहेत् ॥ ३० ॥

छाया.

स्वर्णासमान मम कान्ति जनीं विकासे
ऐसें उगीच भलतें वदतेस कैसें? ।
वेडे, सुवर्ण अनला[10]ननिं सांपडेल
तेव्हां तयांत तव साम्य खरें दिसेल! ॥ ३० ॥

---

१ कवड्यांच्या. २ संध्याकाळपर्यंत. ३ ताक विकण्याकरितां. ४ महेन्द्रनीलमणि. ५ सौंदर्याविषयीं द्वेष. ६ दूर करण्याकरितां. ७ कृष्णमुखाचें सौंदर्य पाहण्यामध्यें. ८ इतक्यांत. ९ (आपलें) शरीर आणि जगत् या उभयावरील प्रेम. १० अग्नीच्या मुखांत.

मूल.

न्यञ्चति वयसि प्रथमे समुदञ्चति तरुणिमनि सुदृशः ।
दधाति स्म मधुरिमाणं वाचो गतयश्च विभ्रमाश्च भृशम् ॥ ३१ ॥

छाया.

हरिणनयनेचें बाल्यें लया जातां
यौवनाचा संचार अंगिं होतां ।
मधुरें गमेतीं अतिशयित मानसास
तिचीं वचनें, गति, तेविं ते विलास ॥ ३१ ॥

मूल.

निःसीमशोभासौभाग्यं नताङ्ग्या नयनद्वयम् ।
अन्योन्यालोकनानन्दविरहादिव चञ्चलम् ॥ ३२ ॥

छाया.

तन्वंगीच्या लोचनयुगला उपमा नाहीं लोकीं ।
परस्परांची भेट होइना चंचल ह्मणुनि जणों कीं ! ॥ ३२ ॥

मूल.

लोचनफुल्लाम्भोजद्वयलोभान्दोलितैकमनाः ।
कस्तूरीतिलकमिषादयमलिकेऽलिस्तवोल्लसति ॥ ३३ ॥

छाया.

विकसितनयनाब्जांचा लोभ करी यन्मतीस चलें भारी ।
कस्तूरीतिलकमिषें तो अलि भालीं तुझ्या विलास करी ॥ ३३ ॥

---

१ हरिणाक्षी प्रियेचें. २ बालपण. ३ तारुण्याचा. ४ गोड. ५ वाटतात. याला 'वचनें,' 'गति,' आणि 'विलास' हे कर्ते. ६ भाषण. ७ गमन. ८ शृंगारचेष्टा. ९ कृशाङ्गी प्रियेच्या. १० दोन डोळ्यांना. ११ तुलना. १२ उभयतांची. १३ नयनरूप प्रफुल्लित कमलांचा. १४ ज्या-(अली-)च्या मतीला. १५ चंचल; 'चल करी' इत्यादि अन्वय. १६ कस्तूरीच्या टिळ्याच्या रूपानें. १७ भ्रमर. १८ कपाळावर.

मूल.

चिन्तामीलितमानसो मनसिजः सख्यो विहीनप्रभाः
प्राणेशः प्रणयाकुलः पुनरसावास्तां समस्ता कथा ।
एतत्त्वां प्रतिबोधयामि मम चेदुक्तिं हितां मन्यसे
मुग्धे मा कुरु मानमाननमिदं राकापति जेष्यति ॥ ३४ ॥

छाया.

चिन्ताग्रस्त[1] अनंग[2], आलिवदनीं[3] आली गतश्रीकता[4]
प्रेमें व्याकुल जीवितेशी[5], परि ही राहोचि सारी कथा ।
इच्छीसी हित आपुलें तरि तुला हें सांगतों संप्रति
वेडे ! मान धरूं नको; वदन हें जिंकील राकापति[6] ॥ ३४ ॥

मूल.

अलंकर्तुं कर्णौ भृशमनुभवन्त्या नवरुजं
ससीत्कारं तिर्यग्वलितवदनाया मृगदृशः ।
कराब्जव्यापारानतिसुकृतसारान् रसयतो
जनुः सर्वश्लाघ्यं जयति ललितोत्तंस भवतः ॥ ३५ ॥

छाया.

श्रुतीं[7] शृंगाराया[8] बहुत नवें[9] पीडीं[10] अनुभवी[11]
करोनी सीत्कारीं[12] मधुर वदनांम्भोज[13] फिरवी ।
तुला त्या कांतेचा घडिघडि करस्पर्श[14] घडतो
महत्पुण्यें[15]; जन्मस्तवन[16], अवतंसा[17] ! विरचितों[18] ॥ ३५ ॥

---

१ चिन्तेनें ग्रासून गेलेला. २ मदन. ३ सख्यांच्या मुखांवर. ४ दैन्य, दीनवाणेपणा. ५ प्राणेश्वर; पति. ६ पूर्णिमेचा प्रिय; पूर्णचंद्र. ७ कान; हें ‘ शृंगाराया ’ याचें कर्म. ८ सुशोभित करण्याकरितां. ९ नवीन. १० दुःख. ११ याला ‘ जी ’ ( कांता ) हा अध्याहृत कर्ता. १२ दुःखाचा सुसकारा. १३ मुखकमल. १४ हाताचा स्पर्श. १५ मोठ्या पुण्यानें. महत्पुण्यें करस्पर्श घडतो इ. अन्वय. १६ ( तुझ्या ) जन्माची प्रशंसा. १७ हे कर्णभूषणा ! १८ ( मी ) करितों.

मूल.

आयातैव निशा निशापतिकरैः कीर्णं दिशामन्तरं
भामिन्यो भवनेषु भूषणगणैरङ्गान्यलंकुर्वते ।
मुग्धे मानमपाकरोषि न मनागद्यापि रोषेण ते
हा हा बालमृणालतोऽप्यतितरां तन्वी तनुस्ताम्यति ॥३६॥

छाया.

झाली प्राप्त निशा; निशापतिकरीं[1] दिङ्मण्डलें[2] व्यापिलीं;
रामांनीं[3] भवनांत भूषणगणीं[4] अंगें अलंकारिलीं[5] ।
वेडे! मान न सोडिशी अजुनि तूं थोडाहि; कोपानलें[6]
हा[7] हा! बालमृणाल[8] लाजवि अशी ही अंगयष्टी[9] जळे! ॥ ३६॥

मूल.

वाचो मांगलिकीः प्रयाणसमये जल्पत्यनल्पं जने
केलीमन्दिरमारुतायनमुखे विन्यस्तवक्त्राम्बुजा ।
निःश्वासग्लपिताधरं परिपतद्बाष्पार्द्रवक्षोरुहा
बाला लोलविलोचना शिव शिव प्राणेशमालोकते ॥ ३७॥

छाया.

जायाच्या समयीं अनेक वदतां आशीर्वचांतें[10] जन[11]
क्रीडामंदिरजालिं[12] हस्तकमलीं ठेऊनियां आनन ।
श्वासां टाकित, अश्रु ढाळित, अहा! *अत्युष्ण, ऐणाक्षि[13] तें[14]
उत्कंठायुतलोचनीं[15] हरहर! प्राणेश्वरा[16] लक्षिते[17] ॥ ३७ ॥

---

१ चंद्राच्या किरणांनीं. २ दिग्भाग. ३ सुंदर स्त्रियांनीं. ४ अनेक अलंकारांनीं. ५ सुशोभित केलीं. ६ कोपाग्नीनें. ७ हाय हाय! ८ कोंवळ्या कमलनालाला. ९ तनु. १० आशीर्वादांना. ११ लोक. जायाच्या समयीं जन अनेक आशीर्वचांतें वदतां (बोलतां, अर्थात् देत असतां) इ. अन्वय. १२ विहारमंदिराच्या खिडकींत. * फार ऊन; हें 'अश्रु' याचें विशेषण. १३ हरिणाक्षी. १४ ती. १५ उत्कंठायुक्त नजरेनें. १६ प्राणपतीला. १७ पाहते.

मूल.

दारिद्र्यं भजते कलानिधिरयं राकाधुना म्लायति
स्वैरं कैरवकाननेषु परितो मालिन्यमुन्मीलति ।
द्योतन्ते हरिदन्तराणि सुहृदां वृन्दं समानन्दति
त्वं चेदंचसि कांचनांगि वदनांभोजे विकासश्रियम् ॥३८॥

छाया.

राका[1]कलानिधि वरी[2]तिल दैन्य[3]लीला
म्लानत्व[4] येइल बसें कुमुदा[5]वलीला ।
दिङ्[6]मण्डलें, स्वजन[7]वृन्दहि हर्ष[8]तील
कांते, जई मुख[9]सरोज तुझें फुलेल ॥ ३८ ॥

मूलं.

पाटीरद्रुभुजङ्गपुङ्गवमुखायाता इवातापिनो
वाता वान्ति दहन्ति लोचनममी ताम्रा रसालद्रुमाः ।
एते हन्त किरन्ति कूजितमयं हालाहलं कोकिला
बाला बालमृणालकोमलतनुः प्राणान् कथं रक्षतु ॥३९॥

छाया.

वायू वाहति, चं[10]न्दनस्थभुजगांपासोनिया उद्गम[11]
ज्यांचीं[12], तापद[13] होति फार नयनां हे ताम्र[14] आम्र[15]द्रुम ।

---

१ पूर्णिमा आणि चंद्रमा. २ धारण करतील. ३ अत्यंत दैन्य. ४ मलिनपणा. ५ चंद्रविकासी कमलांना. ६ दिक्प्रांत. ७ स्वकीय जनांचे समुदाय. ८ आनंदित होतील. ९ मुखकमल. १० चंदनावर असणाऱ्या सर्पांच्या-(मुखां-) पासून. ११ उत्पत्ति. १२ ज्या वायूंचा. 'ज्यांचा चंदनस्थभुजगांपासूनिया उद्गम (ते) वायू वाहति' असा अन्वय. १३ त्रास देणारे. १४ तांबडे. १५ आम्रवृक्ष.

येथें हे विस्तरीति[1] कूजितमिषें[2] हालाहला[3] कोकिल
बाला[4] बालमृणालकोमलतनु[5] प्राणां कशी रक्षिल? ॥ ३९ ॥

मूल.

आयातैव निशा मनो मृगदृशामुन्निद्रमातन्वती
मानो मे कथमेष संप्रति निरातङ्कं हृदि स्थास्यति ।
ऊहापोहमिमं सरोजनयना यावद्विधत्तेतरां
तावत्कामनृपातपत्रसुषमं बिंबं बभासे विधोः ॥ ४० ॥

छाया.

ही आली रजनी[6], जियेंत रमणी[7] होती अतिव्याकुल;
आतां हा मम मान निर्भय कसा चित्तामधें राहिल! ।
ऐसी अंतरिं सुंदराब्जनयना[8] चिंता करूं लागली
तों[9] रम्यद्युति[10] चंद्रबिंब झळके कामातपत्रापरी[11] ॥ ४० ॥

मूल.

विदूरादाश्चर्यस्तिमितमथ किंचित्परिचया-
दुदञ्चच्चाञ्चल्यं तदनु परितः स्फारितरुचि ।
गुरूणां संघातं सपदि मयि याते समजनि
त्रपाघूर्णत्तारं नयनमिह सारङ्गजदृशः ॥ ४१ ॥

छाया.

दुरोनी आश्चर्यें चकितें[12], मग किंचित् परिचयें[13]
घडोनी चांचल्या[14] धरि, पसरि जें[15] कान्तिनिचयें[16] ।

---

१ पसरतात. २ शब्दांच्या रूपानें. ३ हालाहल विषाला. ४ प्रिया. ५ कोंवळ्या कमलनालाप्रमाणें मृदु आहे शरीर जींचें अशी. ६ रात्र. ७ स्त्रिया. ८ सुंदर कमलाप्रमाणें डोळे जिचे अशी प्रिया. ९ इतक्यांत. १० सुंदर आहे कांति ज्याची असें. ११ मदनाच्या छत्राप्रमाणें. १२ हें 'जें' ( नयनद्वंद्व ) याचें विशेषण. १३ ओळख. 'किंचित् परिचय घडोनी' इ० अन्वय. १४ चंचळ होतें. १५ नयनद्वंद्व. १६ कांतीचा पुंज.

वरी[1] लज्जा मोतें[2] गुरुजनसमाजांत[3] बघुनी
मृगाक्षीचें[4] ऐसें विजयि[5] नयनद्वंद्व[6] भुवनीं ॥ ४१ ॥

मूल.

राजानं जनयांबभूव सहसा जैवातृक त्वां तु यः
सोऽयं कुण्ठितसर्वशक्तिनिकरो जातो जरातो विधिः ।
संप्रत्युन्मदखञ्जरीटनयनावक्त्राय नित्यश्रिये
दाता राज्यमखण्डमस्य जगतो धाता नवो मन्मथः॥४२॥

छाया.

चन्द्रा ! राजपदावरी चढविलें ज्यानें तुला आदरें
तो हा आज जरापराहत[7] विधी[8], सामर्थ्य त्याला नुरे[9] ।
आतां राज्य अखंड या अवनिचें[10] धाता[11] नवा मन्मथ*
नित्योल्लासित[12] खंजनाक्षवदना[13] देणार[14] हें निश्चित ॥ ४२ ॥

मूल.

आविर्भूता यदवधि मधुस्यन्दिनी नन्दसूनोः
कान्तिः काचिन्निखिलनयनाकर्षणे कार्मणज्ञा ।
श्वासो दीर्घस्तदवधि मुखे पाण्डिमा गण्डमूले
शून्या वृत्तिः कुलमृगदृशां चेतसि प्रादुरासीत् ॥ ४३ ॥

---

१ लाजतें. २ हें 'बघुनी' याचें कर्म. ३ वडील माणसांत. ४ प्रियेचें. ५ उत्कर्ष पावणारें. ६ नयनयुग्म. ७ जरेनें ग्रस्त. ८ ब्रह्मा. ९ राहिलें नाहीं. १० पृथ्वीचें. ११ ब्रह्मा. * मदन. १२ नेहमीं प्रफुल्लित असणाऱ्या. १३ खंजनपक्ष्यासारखे आहेत डोळे ज्याचे अशा जनाच्या मुखाला; अर्थात् प्रियेच्या मुखाला. १४ 'नवा धाता मन्मथ या अवनिचें अखंड राज्य आतां नित्योल्लासित खंजनाक्षवदना देणार हें निश्चित (आहे.)' असा अन्वय.



छाया.

सकलजनांच्या नयनसमूहा निजसौन्दर्यें हारी :
नन्देसूनुची अशी मनोहर कान्ति प्रकटित झाली ॥
तेव्हांपासुनि वदनिं उसासे, फिकटपणा बहु गालीं ।
शून्य वृत्तिही कुलाङ्गनांच्या अन्तरिं जागृत झाली ॥ ४३ ॥

मूल.

प्रसंगे गोपानां गुरुषु महिमानं यदुपते-
रुपाकर्ण्य स्विद्यत्पुलकितकपोला कुलवधूः ।
विषज्वालाजालं झटिति वमतः पन्नगपतेः
फणायां साश्चर्यं कथयतितरां ताण्डवविधिम् ॥ ४४ ॥

छाया.

कथाप्रसंगें गोपसमाजीं कर्णावरतीं आली ।
कृष्णकथा; तें पुलक थरारे घर्मबिंदुयुत गालीं ॥
अशी कुलवधू आश्चर्यानें कालियमर्दन वानी ।
फार भयंकर गरलज्वाला निघति यदास्यातोनी ॥ ४४ ॥

मूल.

कैशोरे वयसि क्रमेण तनुतामायाति तन्व्यास्तना-
वागामिन्यखिलेश्वरे रतिपतौ तत्कालमस्याज्ञया ।
आस्ये पूर्णशशाङ्कता नयनयोस्तादात्म्यमम्भोरुहां
किञ्चासीदमृतस्य भेदविगमः साचिस्मिते तात्त्विकः॥४५

---

१ हरण करिते. २ कृष्णाची. ३ स्तिमित किंवा मंद अशी वृत्ति. ४ ( व्रजांतील ) कुलीन स्त्रियांच्या. ५ गोष्टीच्या ओघांत. ६ गोपमंडळींत. ७ याला कर्ता ' कृष्णकथा. ' ८ रोमांच. ९ हें 'पुलक' याचें विशेषण. १० गालावर; 'गालीं पुलक थरारे'; इत्यादि अन्वय. ११ कालियसर्पाचें ( कृष्णकृत ) मर्दन. १२ वर्णन करी. १३ विषाच्या ज्वाला. १४ ज्या- ( कालिया- ) च्या मुखांतून.

छाया.

तन्वंगीचें[1] क्रमाक्रमानें बाल्यें[2] लयाला जातां ।
अखिलेश्वर[3] रतिरमणाची[4] त्या स्थानिं[5] योजना होतां ॥
त्याच्या[6] आज्ञेवरुनि तत्क्षणीं पूर्णचन्द्र वदनांत
विकसे, कमलश्री[7] नयनीं, ही अमृत सरसहसितांत[8] ॥४५॥

मूल.

अधरद्युतिरस्तपल्लवा
मुखशोभा शशिकान्तिलंघिनी ।
तनुरप्रतिमा च सुभ्रुवो
न विधेरस्य कृतिं विवक्षति ॥ ४६ ॥

छाया.

रुचिर अधरकान्ती पल्लवां फार हांसे
मधुर[9] विधुहुनीही आननश्री[10] विकासे ।
तनु अनुपम ऐशी वाटते भामिनीची
खचित कृति नसे ही नेहमींच्या विधीची ! ॥ ४६ ॥

मूल.

व्यत्यस्तं लपति क्षणं क्षणमहो मौनं समालंबते
सर्वस्मिन् विदधाति किंच विषये दृष्टिं निरालंबनाम् ।
श्वासं दीर्घमुरीकरोति न मनागङ्गेषु धत्ते धृतिं
वैदेहीविरहव्यथाविकलितो हा हन्त लङ्केश्वरः ॥ ४७ ॥

---

१ कोमलांगीचें. २ बाळपण. ३ सर्वांचा अधिपति. ४ मदनाची. ५ बाल्याच्या ठिकाणीं. ६ मदनाच्या. ७ कमळाची शोभा. ८ प्रेमयुक्त हास्यामध्यें. 'त्याच्या आज्ञेवरूनि तत्क्षणीं वदनांत पूर्णचंद्र, नयनीं कमलश्री, ( आणि ) सरसहसितांत अमृतही विकसे' असा अन्वय. ९ हें आननश्रीचें विशेषण. १० मुखशोभा.

छाया.

केव्हां मौन धरूनियां बसंतसे, केव्हां मुखें चावळे
केव्हां दृष्टि विशून्य[1] सृष्टविषयीं प्रेरूनियां वांवरे ।
केव्हां श्वास सुदीर्घ[2] घेई, अणुही केव्हां धरीना धृती[3]
वैदेहीविरहें[4] व्यथाकुल असा तो[5] होय लंकापती[6] ॥ ४७ ॥

मूल.

उदितं मण्डलमिन्दोरुदितं सद्यो वियोगिवर्गेण ।
मुदितं च सकलललनाचूणामणिशासनेन मदनेन ॥४८॥

छाया.

इन्दुमण्डल[7] उगवलें, विरहिलोक[8]
करूं सहसा लागले फार शोक ।
शिरोरत्नाचि[9] मानिती यन्नियोगें[10]
सकलललना[11], तो हर्पला अनंग[12] ॥ ४८ ॥

मूल.

इदमप्रतिमं पश्य सरः सरसिजै र्वृतम् ।
सखे मा जल्प नारीणां नयनानि दहन्ति माम् ॥४९ ॥

छाया.

बघ हें अनुपम रम्य सरोवर हंसंति[13] यांत कमळींली[14] ।
नको गोष्ट ही सखया; रमणीनयनवृंद[15] मज जाळी ! ॥४९॥

---

* यांना ‘ जो ’ ( लंकापति ) हा कर्ता. १ अगदीं विषयरहित. २ फार मोटा. ३ धैर्य. ४ जानकीच्या विरहानें. ५ जगत्प्रसिद्ध. ६ रावण. ७ चंद्रबिंब. ८ आपल्या प्रियजनापासून दूर असलेले लोक. ‘विरहि लोक सहसा (एकाएकीं) फार शोक करूं लागले’ असा अन्वय. ९ मस्तकावरील उत्कृष्ट भूषण. १० ज्या–(अनंगा-)ची आज्ञा. ११ सगळ्या स्त्रिया. १२ मदन. ‘सकलललना यन्नियोग शिरोरत्नाचि मानिती तो अनंग हर्पला’ असा अन्वय. १३ [illegible] १४ [illegible] १५ [illegible] नयनसमूह.

मूल

मुञ्चसि नाद्यापि रुषं भामिनि मुदिराळिरुदियाय ।
इति सुदृशः प्रियवचनैरपायि नयनाब्जकोणशोणरुचिः ५०

छाया.

उदित[1] होय घनपंक्ति[2] तथापि न, भामिनि! सोडिशि राग ।
लुप्त[3] होय या वचनें[4] दयितानयनकोणगत[5] रंग[6] ॥ ५० ॥

मूल.

आलोक्य सुंदरि मुखं तव मन्दहासं
नन्दन्त्यमन्दमरविन्दधिया मिलिन्दाः ।
किञ्चासिताक्षि मृगलाञ्छनसंभ्रमेण
चञ्चूपुटं चटुलयंति चिरं चकोराः ॥ ५१ ॥

छाया.

मानोनियां स्मितमुखा[7] तुझिया सरोज[8]
आनंदताति बहु अंतरिं भृंगराजे[9] ।
श्यामाक्षि[10]! त्यासि समजोनि सुधांशु[11] चित्तीं
चंचूपुटा चिरें[12] चकोर हि चाळवीती ॥ ५१ ॥

मूल.

स्मितं नैतत्किंतु प्रकृतिरमणीयं विकासितं
मुखं ब्रूते को वा कुसुममिदमुद्यत्परिमलम् ।
स्तनद्वंद्वं मिथ्या कनकनिभमेतत्फलयुगं
लता रम्या सेयं भ्रमरकुलनम्या न रमणी ॥ ५२ ॥

---

१ उदयाला आली; दिसूं लागली. २ मेघमाला. ३ नाहींसा झाला. ४ या शब्दांनीं. '(हे) भामिनि, घनपंक्ति उदित होय तथापि राग न सोडिशी' या प्रियानें उच्चारलेल्या शब्दांनीं. ५ प्रियेच्या डोळ्याच्या कोंपऱ्यामधील. ६ तांबडेपणा, लाली. हा 'लुप्त होय.' याचा कर्ता. ७ मंदहास्ययुक्त मुखकमल. ८ कमलें. 'तुझिया स्मितमुखा सरोज मानोनियां' इ. अन्वय. ९ भ्रमरश्रेष्ठ. १० हे कृष्णनयने! ११ चंद्र. १२ सर्वदा.

छाया.

निसर्गरमणीय हा नवविकास, नोहे स्मितें
ह्मणेल मुख कोण या ? सुम सुगंधि हें निश्चित ।
मृपाच कुचकल्पना, कनकवर्ण हीं सत्फळें
नव्हेचि रमणी, असे रुचिर वल्लरी ही बरें ॥ ५२ ॥

मूल.

संग्रामाङ्गणसंमुखाहतकियद्विश्वंभराधीश्वर–
व्यादीर्णीकृतमध्यभागविवरोन्मीलन्नभोनीलिमा ।
अङ्गारप्रखरैः करैः कवलयन्नेतन्महीमण्डलं
मार्तण्डोऽयमुदेति केन पशुना लोके शशाङ्कीकृतः॥५३॥

छाया.

संग्रामीं पडती असंख्य मरुनी योद्धे क्षितीचे पती
ते ज्या पाडुनि नीलरंध्र वरती जाती स्वरूपाप्रती ।
अङ्गारप्रखरीं करीं कवळि जो हें मेदिनीमण्डल
तो हा सूर्य नभीं; शशांक ह्मणतो त्या कोणता पामर ? ॥५३॥

मूल.

श्यामं सितं च सुदृशो न दृशोः स्वरूपं
किंतु स्फुटं गरलमेतदथामृतं च ।
नो चेत् कथं निपतनादनयोस्तदेव
मोहं मुदं च नितरां दधते युवानः ॥ ५४ ॥

---

१ स्वभावतः सुंदर. २ नूतन प्रफुल्लितपणा. ३ मंद हास्य. ४ फूल. ५ गंधशाली. ६ खोटी. ७ स्तन आहेत अशी समजूत. ८ सोन्याच्या रंगाचीं. ९ चांगलीं फळें. १० स्त्री. * वेल. ११ ज्या सूर्याला. * मोक्ष मिळवितात. १२ निखाऱ्यासारखे तीव्र. १३ किरणांनीं. १४ जो सूर्य. १५ पृथ्वीतल. १६ हा 'प्रकाशतो' या अध्याहृत क्रियेचा कर्ता. १७ सूर्याला. १८ कोणता मूर्ख मनुष्य.

छाया.

दृष्टि[*]स्वरूप सित[1] कृष्णेंहि[2] न प्रियेचें
पीयूष[3] आणि विष तें स्फुट होय साचें ।
नोहे तरी, कुठुनि तत्पतनें[4] नितांत[5]
आनंदमोह[6] तरुणान्तरिं[7] दाटतात ! ॥ ५४ ॥

मूल.

अलिं र्भृगो वा नेत्रं वा यत्र किञ्चिद्विभासते ।
अरविन्दं मृगाङ्को वा मुखं वेदं मृगीदृशः ॥ ५५ ॥

छाया.

कमल काय हें ? मृगांक[8] अथवा ? मुख वा मृगनयनेचें[9] ?।
अलि[10]भृंगनयनासम कांहींसें जिथें दिसे बहु साचें ॥ ५५ ॥

मूल.

दयिते रदनत्विषां मिषा-
दयि तेऽमी विलसन्ति केसराः ।
अपि चालकवेषधारिणो
मकरन्दस्पृहयालवोऽलयः ॥ ५६ ॥

छाया.

प्रियसखि ! दशन[11]प्रभामिषानें
विलसति केसरें[12] हे इथें सुखानें ।

---

* कटाक्ष. १ शुभ्र, पांढरें. २ काळें. ३ अमृत; 'प्रियेचें दृष्टिस्वरूप, सित (आणि) कृष्णही न; तें पीयूष आणि विष साचें स्फुट होय; असा अन्वय. ४ त्या कटाक्षांच्या पातानें. ५ अत्यंत. ६ आनंद आणि दुःख. ७ तरुण पुरुषांच्या अंतःकरणामध्यें. ८ चंद्र. ९ प्रियेचें. १० (कमळें) [illegible] ११ दंतकांतीच्या निमित्तानें. १२ तंतु.

अलि[1] अलकें[2]सुवेप आदरीती[3]
मधुर[4]मरन्दरुचिस्पृहा करीती ॥ ५६ ॥

मूल.

अनिशं नयनाभिरामया
रमया संमदिनो मुखस्य ते ।
निशि निःसरदिन्दिरं कथं
तुलयामः कलयापि पंकजम् ॥ ५७ ॥

छाया.

नयनें[5]सुंदरकांतिनें आननाला[6]
सतत उल्लास[7] प्राप्त तुझ्या झाला ।
वरिलें[8] पंकजें[9] तत्साम्यलव[10]हि काय ?
निशीं ज्याचें[11] सौन्दर्य लया[12] जाय ॥ ५७ ॥

मूल.

अङ्गैः सुकुमारतरैः सा कुसुमानां श्रियं हरति ।
विकलयति कुसुमबाणो बाणाळीभि र्मम प्राणान् ॥ ५८ ॥

छाया.

कोमलतर[13] निजें[14] अंगांनीं ती[15] ने[16] सुमकान्ति[17] हरोनी ।
प्राण व्याकुल करितो माझे कुसुमबाण[18] बाणांनीं ॥ ५८ ॥

---

१ भ्रमर. २ कुटिलकेशरूप चांगला वेष. ३ स्वीकारतात. ४ गोड रसाच्या आस्वादाची इच्छा. ५ नेत्रांना आनंद देणाऱ्या कांतीनें. ६ तोंडाला. ७ टवटवी. ८ धारण करील. ९ (सूर्यविकासि) कमल. १० आननाची थोडी तरी बरोबरी. ११ ज्या पंकजाचें. १२ नाश पावतें. १३ अधिक मऊ. १४ आपल्या. १५ प्रिया. १६ 'हरोनी ने' असा अन्वय. १७ पुष्पांची शोभा. १८ मदन.

मूल.

मथुरागमनोन्मुखे मुरारा-
वसुभारार्तिभृतां व्रजाङ्गनानाम् ।
प्रलयज्वलनायते स्म राका
भवनाकाशमजायताम्बुराशिः ॥ ५९ ॥

छाया.

गोकुळ सोडुनि जाया लागे मथुरेलागि मुरारी[1]
व्रजेरमणींना[2] तई जाहले[3] प्राण आपुले भारी ।
प्रलयानलसम[4] पूर्णशशांका[5] रजनी गमलि[6] तयांना[7]
सुंदर सौधप्रान्त[8] सिंधुसा[9] दिसला तन्नयनांना ॥ ५९ ॥

मूल.

मान्थर्यमाप गमनं सह शैशवेन
रक्तं सहैव मनसाधरबिंबमासीत् ।
किंचाभवन्मृगकिशोरदृशो नितम्बः
सर्वाधिको गुरुरयं सह मन्मथेन ॥ ६० ॥

छाया.

बाल्यासवें[10] गमन[11] मन्थरतेस[12] गेलें
चित्तासवें अधरबिंब सुरक्त[13] झालें ।
तैसा[14] नितंब[15] मृगबालकलोचनेचा[16]
कामासवें[17] अखिलगौरव[18] दावि साचा ॥ ६० ॥

---

१ श्रीकृष्ण. २ व्रजांतील स्त्रियांना. ३ जड. ४ प्रळयकाळच्या अग्नीप्रमाणें. ५ पूर्णिमा. ६ वाटली. ७ व्रजस्त्रियांना. ८ वाड्यांतील प्रदेश. ९ समुद्रासारखा. १० बाळपणाबरोबर. ११ गति, चालणें. १२ मंदपणाप्रत. १३ चित्ताकडे अत्यंत प्रेमयुक्त; अधरबिंबाकडे लालभडक. १४ त्याप्रमाणेंच. १५ कटिपश्चाद्भाग. १६ बालमृगाप्रमाणें आहेत नेत्र जिचे अशा स्त्रीचा किंवा प्रियेचा. १७ मदनाबरोबर. १८ सर्वांपेक्षां जडपणा.

मूल.

श्वासोऽनुमानवेद्यः शीतान्यङ्गानि निश्चला दृष्टिः ।
तस्याः सुभग कथेयं तिष्ठतु तावत्कथान्तरं कथय ॥६१॥

छाया.

श्वास अनुमानें[1] मात्र कळे; दृष्टि
स्तिमित झाली; गारेली[2] अंगयष्टि[3] ।
असो मित्रा ! ही तिची दुःखवार्ता
सांग कांहीं दुसरीच गोष्ट आतां ॥ ६१ ॥

मूल.

पाणौ कृतः पाणिरिलासुतायाः
सस्वेदकम्पो रघुनन्दनेन ।
हिमाम्बुझंझानिलसंयुतस्य
प्रभातपद्मस्य बभार शोभाम् ॥ ६२ ॥

छाया.

सीताकरा[4] करिं धरी प्रभु रामचन्द्र
संस्वेद[5] कंप सुटला तइं त्यास सांद्र[6] ।
झंझानिलान्वित[7] हिमें[8] नलिनें[9] प्रभातीं
जेवीं दिसे, दिसलि तेविंच तत्प्रभा[10] तो[11] ॥ ६२ ॥

मूल.

अरुणमपि विद्रुमद्रुं मृदुलतरं चापि किसलयं बाले ।
अधरीकरोति नितरां तवाधरो मधुरिमातिशयात् ॥६३॥

---

१ तर्कांनें. २ गारठून गेली. ३ कोमल तनु. ४ सीतेच्या हाताला. ५ घर्मयुक्त. ६ दाट. ७ झंझावातांनें युक्त. ८ दंवानें. ९ कमल. १० सीतेच्या हाताची कांति. ११ तो तत्प्रभा तेविंच दिसलि इ. अन्वय.

छाया.

अरुण[1]वर्णहि विद्रुम[2]वल्लरी
मृदुल[3] पल्लव फार असे तरी ।
अधर त्या उभया[4]सहि सांप्रत
मधुरिमातिशयें[5] करि लज्जित ॥ ६३ ॥

मूल.

नयने वहतां नु खञ्जनाना-
मिह नानाविधसङ्गभङ्गभाग्यम् ।
मुखमेतु तुलां कथं सुशोभं
सुदृशो भङ्गुरसंपदाम्बुजेन ॥ ६४ ॥

छाया.

करुत[6] नयन लीला[7] खंजनाच्या[8] विचित्र
खचित मज न वाटे त्यांत कांहींच चित्रें[9] ।
परि रुचि रुचिरा ही सुन्दरि! त्वन्मुखाची
कमलें[10]! वरिल केवीं? भंगुर[11] श्री[12] जयाची[13] ॥ ६४ ॥

मूल

परपूरुषदृष्टिपातवज्रा-
हतिभीता हृदयं प्रियस्य सीता ।
आविशत्परकामिनीभुजङ्गी-
भयतः सत्वरमेव सोऽपि तस्याः ॥ ६५ ॥

---

१ तांबड्या रंगाची. २ पोंवळ्याची वेल. ३ मऊ 'पल्लव फार मृदुल असे तरी' इ. अन्वय. ४ 'विद्रुमवल्लरी' आणि 'पल्लव' यांस. ५ सौंदर्याधिक्यानें. ६ 'नयन खंजनाच्या विचित्र लीला करुत,' असा अन्वय. ७ विलास. ८ खंजरीट पक्ष्याच्या. ९ नवल, आश्चर्य. १० 'परि (हे) सुंदरि! जयाची श्री भंगुर आहे (तें) कमल त्वन्मुखाची ही रुचिरा रुचि केवीं वरिल' असा अन्वय. ११ क्षणिक. १२ शोभा. १३ ज्या कमलाची.

छाया.

पर[1]दृष्टिकठोरवज्रभीता
शिरली [2]स्वप्रियहृत्प्रदेशिं सीता ।
प्रविशे पर[3]कामिनीभुजंगी–
भय वाटोनि हि तो[4] तद[5]न्तरंगीं ॥६५॥

मूल

निभाल्य भूयो निजगौरिमाणं
मा नाम मानं सहसैव यासीः ।
गृहे गृहे पश्य तवाङ्गवर्णा
मुग्धे सुवर्णावलयो लुठन्ति ॥ ६६ ॥

छाया.

नि[6]जवर्ण पुन्हां पुन्हां बघोनी
सहसा गर्व कधीं न चिंत्त मानीं ।
प्र[7]तिगेहिं, किती तवा[8]ङ्गकान्ती
सखये ! कांच[9]नराजि लोळताति ! ! ॥ ६६ ॥

मूल.

अधरेण समागमाद्ददाना-
मरुणिम्ना पिहितोऽपि शुक्लभावः ।
हसितेन सितेन पक्ष्मलाक्ष्याः
पुनरुल्लासमवाप जातपक्षः ॥ ६७ ॥

---

१ परपुरुषाच्या दृष्टिरूप कठोर वज्राला भ्यालेली. २ आपल्या पती-च्या (रामचंद्राच्या) हृदयप्रांतामध्यें. ३ परस्त्रीरूप सर्पिणीची भीति. ४ रामचंद्र; हा 'प्रविशे' याला कर्ता. ५ जानकीच्या हृदयांत; 'कामिनीभुजंगीभय वाटोनि तोहि तदन्तरङ्गीं प्रविशे,' असा अन्वय. ६ आपला रंग. ७ घरोघरीं. ८ तुझ्या अंगाच्याप्रमाणें आहे कान्ति ज्यांची अशा. ९ सुवर्णपंक्ति.

छाया.

धवलपणा दंतांचा लोपे अरुणाधरसंयोगें ।
हास्यवशें तो हरिणाक्षीच्यां पुनरपि झळकूं लागे ! ॥६७॥

मूल

सरसिरुहोदरसुरभावधरितबिंबाधरे मृगाक्षि तव ।
वद वदने मणिरदने ताम्बूलं केन लक्षयेम वयम् ॥६८॥

छाया.

दंत हिरकण्या, अधर लाजवी परिणतबिंबफलाला ।
प्रतिक्षणीं विसरितें विलासें कमलोदरगंधाला ॥
सरसिजनयने ! सहजचि शोभा तव वदनाची ऐशी ।
तांबूलश्री तथांत गोचर होइल नयनां केशी ? ॥ ६८ ॥

मूल.

किमिति कृशासि कृशोदरि किं तव परकीयवृत्तांतैः ।
कथय तथापि मुदे मम कथयिष्यति पथिक तव जाया॥६९

छाया.

कां कृश दिसशि कृशोदरि ! उगिच उठाठेव ही तुला कां रे ?।
मंद्रंजनार्थ तरि वद, पथिका ! जाया तुझी कथिल सारें ! ॥६९॥

---

१ तांबड्या रंगाच्या ओंठाशीं मिळाल्यामुळें. २ हास्याच्या जोडीनें; हास्य मदतीला आल्यामुळें. हास्याचा रंग धवल असतो असा कविसमय आहे. ३ प्रियेच्या ४ पिकलेल्या तोंडल्याला. ५ पसरितें. ६ लीलेनें. ७ कमलांतल्या गाभ्याच्या वासाला. ८ हे कमलनयने ! ९ साहजिकपणें, स्वभावतः. १० विड्याची शोभा. ११ वदनांत. १२ दृश्य. १३ क्षीण आहे उदर जिचें असे स्त्रिये ! १४ माझ्या करमणुकीकरितां. १५ अगा पांथा !

# करुणविलास.

मूल.

दैवे पराग्वदनशालिनि हन्त जाते
याते च संप्रति दिवं प्रति बन्धुरत्ने ।
कस्मै मनः कथयितासि निजामवस्थां
कः शीतलैः शमयिता वचनैस्तवाधिम् ॥ १ ॥

छाया.

हा हाय ! दैवगति काय विचित्र झाली !
प्रांणेश्वरी[1] त्यजुनियां मज दूर[2] गेली ! ।
कोणासि हृद्गतें[3], मनीं[4], कथिशील आतां ?
बोलोनि गोड तव वारिल कोण चिन्ता ? ॥१॥

मूल.

प्रत्युद्गता सविनयं सहसा पुरेव
स्मेरैः स्मरस्य सचिवैः सरसावलोकैः ।
मामद्य मंजुरचनै र्वचनैश्च बाले
हा लेशतोऽपि न कथं शिशिरीकरोषि! ॥ २ ॥

छाया.

येतां[5] गृहा, पुढतिं[6] येउनि संभ्रमानें[7]
आनंदवीशि[8] सरसस्मितवीक्षणानें[9] ।
ती तूं सुधामधुर[10] शब्द वदोनि आर्जा
कां तापशान्ति[11] लवही करिशी न माझी ! ॥२॥

---

१ प्राणांची मालकीण; अर्थात् प्रिया, स्त्री. २ स्वर्गाला गेली. ३ हित-गुज. ४ अगा मना ! ५ ( मी ) घराला आलों असतां. ६ सामोरें. ७ लगबगीनें. ८ आनंद देत होतीस. ९ सप्रेममन्दहास्ययुक्त कटाक्षांनीं. १० अमृतासारखे गोड. ११ दुःखशमन.

मूल.

सर्वेऽपि विस्मृतिपथं विषयाः प्रयाता
विद्यापि खेदकलिता विमुखीबभूव ।
सा केवलं हरिणशावकलोचना मे
नैवापयाति हृदयादधिदेवतेव ॥ ३ ॥

छाया.

नानाविचित्रविषयस्मृतिही[1] बुजाली[2]
विद्या श्रमार्जित[3] पराङ्मुख[4] तेविं झाली ।
ती[5] मात्र एक विलसे अधिदेवतेशी[6]
सारंगबालनयना[7] हृदयप्रदेशीं[8] ॥ ३ ॥

मूल.

निर्वाणमङ्गलपदं त्वरया विशन्त्या
मुक्ता दयावति दयाऽपि किल त्वयासौ ।
यन्मां न भामिनि निभालयसि प्रभात-
नीलारविन्दमदभङ्गिपदैः कटाक्षैः ॥ ४ ॥

छाया.

निर्वाणमंदिरिं[9] जंवें[10] शिरतां दयाही
त्वां सोडिलीस सदये! कृति योग्य कां ही ? ।

१ विविध आणि चमत्कारिक विषयांचें स्मरण. २ नाहींशी झाली. ३ कष्टानें प्राप्त करून घेतलेली. ४ विमुख. ५ प्राणसखी. ६ मुख्य देवतेसारखी. ७ हरिण[illegible] अशी. ८ अंतःकरणांत. ९ मोक्षमंदिरांत. १० गर्दीनें; लगबगीनें.

आतां त्वदीय नवपंकजगर्वहारी
प्रेमप्रपूरित कटाक्ष न तोंप वारीं ॥ ४ ॥

मूल.

धृत्वा पदस्खलनभीतिवशात् करं मे
या रूढवत्यसि शिलाशकलं विवाहे ।
सा मां विहाय कथमद्य विलासिनि द्या-
मारोहसीति हृदयं शतधा प्रयाति ॥ ५ ॥

छाया.

माझ्या करा धरुनि, भीरु ! पुरा विवाहीं
यत्नें शिलाशकलिं तूं चढलीस, पाहीं ! ।
स्वर्गास आज चढशी असहाय, हाय !
तेणें प्रिये ! हृदय भंगुनि चूर्ण होय ! ॥ ५ ॥

मूल.

निर्दूषणा गुणवती रसभावपूर्णा
सालंकृतिः श्रवणकोमलवर्णराजिः ।
सा मामकीनकवितेव मनोभिरामा
रामा कदापि हृदयान्मम नापयाति ॥ ६ ॥

---

१ ताज्या कमळाच्या गर्व हरण करणारा. हें व पुढील पद अशीं 'कटाक्ष' याचीं विशेषणं होत. २ प्रेमानें ओतप्रोत भरलेला. ३ दुःख. ४ निवारण करी. ५ हातालाः ६ अगे भित्रे स्त्रिये ! ७ पूर्वी. ८ लग्नामध्यें. ९ मोठ्या शिकस्तीनें. १० सहाणेवर; लग्नामध्यें वधूला सहाणेवर उभी करण्याचा एक संस्कार आहे त्याला अनुलक्षून हें वर्णन आहे.

छाया.

निर्दूषणा[1] गुणवती[2] रसभावपूर्णा[3]
सालंकृति[4] श्रवणकोमलकान्तवर्णा[5] ।
अत्यंत रम्य कवितेसम[6] माझिया जे[7]
कान्ता त्यजी हृदयमन्दिर हें न माझें ॥ ६ ॥

मूल.

चिन्ता शशाम सकलापि सरोरुहाणा-
मिन्दोश्च बिम्बमसमां सुषमामयासीत् ।
अभ्युद्गतः कलकलः किल कोकिलानां
प्राणप्रिये यदवधि त्वमितो गतासि ॥ ७ ॥

छाया.

चिंता सरोजमनिंची[8] सगळी निवाली[9]
झालें विशेष विधुबिंबहि[10] कांतिशाली[11] ।
केला सुरू कलकलाट तसा पिकांनीं[12]
गेलीस तूं इथुनि हें परिसूनि कानीं ॥ ७ ॥

---

१ दोषरहित. कान्तापक्षीं शारीरिक किंवा मानसिक कोणतेंही व्यंग त्यानें रहित; कवितापक्षीं श्रुतिकटुता, ग्राम्यता, अनुचितार्थता इत्यादि दोषांनीं रहित. २ कांतापक्षीं पातिव्रत्यादि गुणांनीं युक्त; कवितापक्षीं प्रसाद, माधुर्य आणि ओज या काव्यगुणांनीं युक्त. ३ कांतापक्षीं पतिविषयक प्रेम व निष्ठा यांनीं परिपूर्ण; कवितापक्षीं शृंगार, वीर, इत्यादि रस, व या रसांचा परिपोष करणारे रति, हास्य, निर्वेद, ग्लानि, इत्यादि भाव यांनीं परिप्लुत. ४ कांतापक्षीं भूषणांनीं युक्त; कवितापक्षीं शब्दार्थालंकारांनीं युक्त. ५ कांतापक्षीं कर्णमधुर सुंदर ध्वनि आहे जिचा अशी; कविता-पक्षीं कर्णमधुर सुंदर वर्णरचना जिची अशी. ६ कवितेसारखी. ७ जी (कान्ता). ८ कमळाच्या मनांतील. ९ शांत झाली; दूर झाली. १० चंद्राचें बिंब. ११ कांतीनें शोभणारें. १२ कोकिलांनीं.

मूल.

सौदामिनीविलसितप्रतिमानकाण्डे
दत्वा कियन्त्यपि दिनानि महेन्द्रभोगान् ।
मन्त्रोज्झितस्य नृपतेरिव राज्यलक्ष्मी-
र्भाग्यच्युतस्य करतो मम निर्गतासि ॥ ८ ॥

छाया

वि[1]द्युत्प्रभातरल राजे[2]विलासभोग
देऊनीयां घडविशी सहसा वियोग ।
मन्त्रच्युता[3] त्यजुनि जाय रमा[4] नृपाशी
तूं भाग्यहीन पति सोडुनि तेविं जाशी ॥ ८ ॥

मूल

केनापि मे विलसितेन समुद्गतस्य
कोपस्य किं न करभोरु वशंवदाभूः ।
यन्मां विहाय सहसैव पतिव्रतापि
यातासि मुक्तिरमणीसदनं विदूरम् ॥ ९ ॥

छाया.

माझ्याकडोनि घडला अपराध कांहीं
तेणें मनामधि अढी धरिलीस कां ही ? ।
नोहे तरी मजसि टाकुनि मुं[5]क्तिगेहीं
गेलीस केविं अति दूर ? पति[6]व्रताही ! ॥ ९ ॥

मूल.

काव्यात्मना मनसि पर्यणमन्पुरा मे
पीयूषसारसरसास्तव ये विलासाः ।

---

१ विजेच्या प्रकाशाप्रमाणें क्षणभंगुर. २ राजविलासांचा उपभोग. ३ सदुपदिष्ट मार्गापासून भ्रष्ट अशा ( नृपाशीं ). ४ लक्ष्मी. ५ मोक्षमंदिराला. ६ पति व्रत जिचें अशीही ( तूं ).

तानन्तरेण रमणी रमणीयशीले
चेतोहरा सुकविता भविता कथं नः ॥ १० ॥

छाया.

काव्यस्वरूप धरुनी अवतीर्ण झाले
पीयूषतुल्य[1] तव गोड विलास, चाले ।
त्यांच्याविणें[2] मधुर, कोमल, कान्त ऐशी
केवीं घडेल कविता ? न कळे मतीशी ॥ १० ॥

मूल.

या तावकीनमधुरस्मितकान्तिकान्ते
भूमण्डले विफलतां कविषु व्यतानीत् ।
सा कातराक्षि विलयं त्वयि यातवत्यां
राकाधुना वहति वैभवमिन्दिरायाः ॥ ११ ॥

छाया.

झाली सुरम्य[3] जगती[4] तव मञ्जुहासें[5]
तेणें जिची[6] विफलता[7] कविलागि भासे ।
ती पूर्णिमा परिसुनी तव दुर्दशेचें
वृत्त, स्वतां मिरवि वैभव इंदिरेचें[8] ! ॥ ११ ॥

मूल.

मन्दस्मितेन सुधया परिषिच्य या मां
नेत्रोत्पलै विकसितैरनिशं समीजे ।
सा नित्यमङ्गलमयी गृहदेवता मे
कामेश्वरी हृदयतो दयिता न याति ॥ १२ ॥

---

१ अमृतासारखे (गोड). २ त्या विलासांशिवाय. ३ अत्यंत रम्य. ४ पृथिवी. ५ मधुर हास्यानें. ६ ज्या पूर्णिमेची. ७ व्यर्थपणा. ८ लक्ष्मीचें.

छाया.

मंदस्मितामृतभरें अभिषिंचियेलें
उत्फुल्लनेत्रकमलीं मज पूजियेलें ।
ती नित्यमङ्गलमयी गृहदेवता ही
प्राणेश्वरी हृदय सोडुनि जात नाहीं ! ॥ १२ ॥

मूल.

भूमौ स्थिता रमण नाथ मनोहरेति
संबोधनैर्यमधिरोपितवत्यसि याम् ।
स्वर्गं गता कथमिव क्षिपसि त्वमेण-
शावाक्षि तं धरणिधूलिषु मामिदानीम् ॥ १३ ॥

छाया.

संबोधुनी रमणा ! नाथ ! अशा पदांहीं
स्वर्गासमान मज भासविली धरा ही ।
स्वर्गस्थ होउनि, इथें मज आजि कांय
धूळींत लोळविशि मानिनि ? हाय हाय ! ॥१३॥

मूल.

लावण्यमुज्ज्वलमपास्ततुलं च शीलं
लोकोत्तरं विनयमर्थमयं नयं च ।
एतान्गुणानशरणानथ मां च हित्वा
हा हन्त सुंदरि, कथं त्रिदिवं गतासि ॥ १४ ॥

---

१ मन्दहास्यरूप अमृताच्या संचयानें. २ अभिषेक केला. ३ प्रफुल्लित अशा नेत्ररूपकमलांनीं. ४ सर्वदा मंगलयुक्त. ५ घरांतील देवता; 'ती ही नित्य मंगलमयी गृहदेवता प्राणेश्वरी हृदय सोडुनि जात नाहीं' असा अन्वय. ६ हांक मारून. ७ हे रमणा ! ८ हे नाथा ! ९ अशा शब्दांनीं. १० ही पृथिवी. ११ स्वर्गवासिनी होऊन. १२ या पृथ्वीवर. १३ हे मानिनि प्रिये !

छाया.

सौन्दर्य अप्रतिम, शील तसें उदार
शालीनता[1] रुचिर, वर्तन शुद्ध फार ।
या सर्व आश्रयविहीन[2] गुणां, मलाही
टाकोनि जाशि ! करुणा तुज काय नाहीं ? ॥ १४ ॥

मूल.

कान्त्या सुवर्णवरया, परया च शुद्ध्या
नित्यं स्विकाः खलु शिखाः परितः क्षिपन्तीम् ।
चेतोहरामपि कुशेशयलोचने त्वां
जानामि कोपकलुषो दहनो ददाह ॥ १५ ॥

छाया.

उत्कृष्ट शुद्धि, कनकाधिक[3] कान्ति, यांनीं[4]
ज्वालांसि[5] लाजविशि नित्य, सखे ! ह्मणोनी ।
क्रोधें[6] तुला दहनें[7] जाळुनि टाकि वाटे !
त्वद्दर्शनें[8] जरि मनीं अतिमोह दाटे ॥ १५ ॥

मूल.

कर्पूरवर्तिरिव लोचनतापहन्त्री
फुल्लाम्बुजस्रगिव कण्ठसुखैकहेतुः ।
चेतश्चमत्कृतिपदं कवितेव रम्या
नम्या नरीभिरमरीव हि सा विरेजे ॥ १६ ॥

---

१ नम्रपणा. २ आधाररहित; निराश्रय. हें 'गुणां' आणि 'मला' या दोन्ही पदांकडे लावावयाचें. ३ सोन्यापेक्षां जास्त. ४ या गुणांनीं. ५ (दहनाच्या) ज्वाळांना. ६ रागानें. ७ अग्नि. ८ तुला पाहिल्यानें.

छाया.

कर्पूरवर्तिसम दे नयनोत्सवाला
कंठासही सुखवि जेविं नवाब्जमाला ।
उल्हासवी सुकवितेसम जी मतीशीं
स्त्रीवंद्य ती* विलसली सुरसुन्दरीशी ॥ १६ ॥

मूल.

स्वप्नान्तरेऽपि खलु भामिनि पत्युरन्यं
या दृष्टवत्यासि न कंचन साभिलाषम् ।
सा संप्रति प्रचलितासि गुणै र्विहीनं
प्राप्तं कथं कथय हन्त परं पुमांसम् ॥ १७ ॥

छाया.

भोगावया भुवनिं, भामिनि हे! विलास
स्वप्नांतही न दुसरा पति पाहिलास ।
कैशी मला त्यजुनि आज रसातळीं या
जातेस निर्गुण–परा पुरुषा भजाया ॥ १७ ॥

मूल.

दयितस्य गुणाननुस्मरन्ती
शयने संप्रति या विलोकितासीत् ।
अधुना खलु हन्त सा कृशाङ्गी
गिरमङ्गीकुरुते न भाषितापि ॥ १८ ॥

---

१ कापराच्या वातीप्रमाणें. २ नयनानंदाला. ३ ताज्या कमळांची माळ. ४ आनंद देई. ५ चांगल्या कवितेसारखी. ६ जी कांता. ७ मनाला. ८ स्त्रीसमुदायाला वंदनीय. *प्राणसखी. ९ देवांगनेप्रमाणें. १० याचें कर्म 'विलास'. ११ हे भामिनि! १२ गुणहीन आणि परका अशा; पक्षीं गुणत्रयातीत अतएव निर्गुण आणि उत्कृष्ट अशा. १३ वरण्यास; सेवन करण्यास.

छाया.

पतिचे गुण आठवीत चित्तीं
वसली जी इतुक्यांत तल्पिं होती ।
मजशीं प्रतिशब्द ती न आतां
करि तन्वी, जरि जोडिं तीस हातां ॥१८॥

मूल

रीतिं गिराममृतवृष्टिकरीं तदीयां
तां चाकृतिं कृतिवरैरभिनन्दनीयाम् ।
लोकोत्तरामथ कृतिं च सुधारसार्द्रां
स्तोतुं न कस्य समुदेति मनःप्रसारः ॥ १९ ॥

छाया.

वाक्चातुरी अमृतवृष्टिकरी तदीयें
ती आकृती कृतिवरां अभिनन्दनीय ।
आचार अद्भुत सुधारसतुल्य साचा
उल्लास होय कवणास न गावयाचा ? ॥१९॥

---

१ 'पतिचे गुण चित्तीं आठवीत जी इतुक्यांत तल्पिं वसली होती' असा अन्वय. २ शयनावर. ३ संभाषण. ४ कोमलांगी. ५ (मी) जोडतों. ६ तिला. ७ बोलण्याचें चातुर्य. ८ अमृताचा वर्षाव करणारी. ९ तिची, प्रियेची. १० चतुरश्रेष्ठांना. ११ आनंद. १२ ( वर निर्दिष्ट केलेले प्रियेचे गुण ) 'गावयाचा कवणास उल्लास न होय,' असा अन्वय.

# शान्तविलास.

मूल.

विशालविषयाटवीवलयलग्नदावानल-
प्रसृत्वरशिखावलीविकलितं मदीयं मनः।
अमन्दमिलदिन्दिरे निखिलमाधुरीमन्दिरे
मुकुन्दमुखचंदिरे चिरमिदं चकोरायताम् ॥ १ ॥

छाया.

महाविषयकाननीं[1] प्रकट[2] होय दावानल[3]
शिखा[4] पसरुनी करी मम मनास तो[5] व्याकुल[6]।
जयांत[7] वसती सदा अखिल इंदिरा[8], माधुरी[9]
असा हरिमुखेन्दु[10] तें[11] चिरं[12] पिवो चकोरापरी[13] ॥ १ ॥

मूल.

अये जलधिनन्दिनीनयननीरजालम्बन
ज्वलज्ज्वलनजित्वरज्वरभरत्वराभङ्गुरम्।
प्रभातजलजोन्नमद्गरिमगर्वसर्वंकषै-
र्जगत्रितयरोचनैः शिशिरयाशु मां लोचनैः ॥ २ ॥

---

१ प्रचंड विषयरूप अरण्यांत. २ उत्पन्न होतो. ३ वणवा. ४ ज्वाळा पसरून. ५ वणवा. ६ व्याकुल करी इ. अन्वय. ७ ज्या हरिमुखेन्दुमध्यें. ८ लक्ष्मी; शोभा. ९ माधुर्य, गोडपणा. १० कृष्णाचा मुखचंद्र; हें 'पिवो,' याचें कर्म. ११ मन. हा 'पिवो,' याचा कर्ता. १२ एकसारखें, सर्वदा; अखंड. १३ चकोरपक्ष्याप्रमाणें.

छाया.

अगा जैलधिकन्यकानयनपंकजालम्बना !
अतिप्रखर ताप ह्या भैवज तापवी मन्मना ।
प्रभातकमळें जयां बघुनि लाजती अन्तरीं
अशा रुचिरैलोचनीं मजसि शांतवीं सत्वरीं ॥२॥

मूल.

स्मृतापि तरुणातपं करुणया हरन्ती नृणा-
मभङ्गुरतनुत्विषां वलयिता शतै र्विद्युताम् ।
कलिन्दगिरिनन्दिनीतटसुरद्रुमालम्बिनी
मदीयमतिचुम्बिनी भवतु कापि कादम्बिनी ॥ ३ ॥

छाया.

जिचें स्मरणही हॅरी प्रखर ताप एके क्षणीं
स्थिरद्युति सभोंवतीं विलसताति सौदामिनी ।
वॅसे तपनकॅन्यकातटिं सुरद्रुमांच्यांवरी
विलॅक्षण घॅनावली अशि मना दिसो सत्वरी ॥ ३ ॥

मूल.

कलिन्दगिरिनन्दिनीतटवनान्तरं भासयन्
सदा पथि गतागतश्रमभरं हरन् प्राणिनाम् ।

---

१ लक्ष्मीच्या नयनकमलाच्या आश्रया. २ संसारापासून झालेला. ३ ज्या लोचनांना. ४ मनामध्यें. ५ सुंदर नयनांनीं; अर्थात् कृपाकटाक्षांनीं. ६ शांत कर. ७ हरण करिते; दूर करिते. ८ एकसारखें आहे तेज ज्यांचें अशा ( सौदामिनी ). ९ चमकतात. १० विजा. ( जिच्या ) सभोंवतीं स्थिरद्युति सौदामिनी विलसनाति, असा अन्वय. ११ याला 'जी' ( घनावली ) हा [illegible]. १२ [illegible] कांठीं. १३ देववृक्षांवर. १४ अद्भुत, असामान्य, अलौकिक. १५ मेघमाला.

लतावलिशतावृतो मधुरया रुचा संभृतो
ममाशु हरतु श्रमानतितरां तमालद्रुमः ॥ ४ ॥

छाया.

कलिन्दतनयातटावरिल[1] काननें[2] भासवी[3]
लतावलिविभूषणीं[4] रुचिर फार ज्यांची[5] छवी[6] ।
सदा भ्रमंति[7] जे पंथीं[*], शमवि[†] त्या जनांचे श्रम
मम श्रमहि संहरो[8] त्वरित तो[9] तमालद्रुम ॥ ४ ॥

मूल.

वाचा निर्मलया सुधामधुरया यां नाथ शिक्षामदा-
स्तां स्वप्नेऽपि न संस्मराम्यहमहंभावावृतो निस्त्रपः ।
इत्यागःशतशालिनं पुनरपि स्वीयेषु मां बिभ्रत-
स्त्वत्तो नास्ति दयानिधिर्यदुपते मत्तो न मत्तोऽपरः॥५॥

छाया.

केला प्रेमळ आणि गोड वचनीं त्वां बोध, बापा, खरें[10]
लज्जाहीन मदान्ध मी परि तयां[11] स्वप्नांतही न स्मरें !
ऐशीं पापशतें[12] करीं तरि मला तूं मानिशी आपुला[13]
होशी त्वत्सम[14] तूं दयाळु, मजसा[15] मी मत्त[16], देवेश्वरा[17]! ॥५॥

---

१ यमुनेच्या तीरावरील. २ अरण्यें. ३ देदीप्यमान किंवा प्रभायुक्त करितो. याला 'जो' (तमालद्रुम) हा अध्याहृत कर्ता. ४ अनेक लतारूप मोठ्या अलंकारांनीं. ५ ज्या तमालद्रुमाची. ६ कांति. ७ भटकतात; येरझारा करतात. *(जन्ममरणरूप) मार्गांमध्यें. †दूर किंवा शांत करितो. 'जो' (तमालद्रुम) हा याचा अध्याहृत कर्ता. 'जे सदा पथीं भ्रमति त्या जनांचे श्रम (जो तमालद्रुम) शमवि,' असा अन्वय. ८ दूर करो. ९ अनिर्वचनीय तमालवृक्ष. १० (हें) खरें (आहे). ११ त्या बोधाला. १२ शेंकडों पापें. १३ स्वकीय. १४ तुझ्यासारखा. १५ माझ्यासारखा. १६ माजलेला. १७ देवाधिदेवा.

मूल.

पातालं व्रज याहि वा सुरपुरीमारोह मेरोः शिरः
पारावारपरंपरां तर तथाप्याशा न शान्ता तव ।
आधिव्याधिजरापराहत यदि क्षेमं निजं वाञ्छसि
श्रीकृष्णेति रसायनं रसय रे शून्यैः किमन्यैः श्रमैः॥६॥

छाया.

पाताळीं अथवा सुरेन्द्र[१]नगरीं जा मेरुच्या वा शिरीं
लंघीं सातहि सागरांप्रति; तुझी आशा न संपे तरी ।
चिन्तारोगपराहता[२] जरि नरा[३] ! कल्याण व्हावें तुझें
श्रीकृष्णाख्य रसायना भज तरी; निःसार सारें दुजें ॥ ६ ॥

मूल.

मृद्वीका रसिता सिता समशिता स्फीतं निपीतं पयः
स्वर्यातेन सुधाप्यधायि कतिधा रम्भाधरः खण्डितः ।
सत्यं ब्रूहि मदीय जीव भवता भूयो भवे भ्राम्यता
कृष्णेत्यक्षरयोरयं मधुरिमोद्गारः क्वचिल्लक्षितः ॥ ७ ॥

छाया.

द्राक्षें चाखिलिं, सेविली बहु सिता[४], स्वच्छोदक प्राशिलें
पीयूष[५] [६]त्रिदिवीं पिऊनि कितिदां[७] रंभाधरां खण्डिलें ।
जीवा[८] ! सांग खरोखरीच फिरतां संसारचक्रावरी
गोडी आढळली कुठें तरि तुला श्रीकृष्णशब्दांतली ? ॥ ७ ॥

---

१ अमरावतीला. २ मनाच्या आणि शरीराच्या रोगांनीं जर्जर झालेल्या; हें 'नरा,' याचें विशेषण. ३ अगा मानवा ! जरि कल्याण व्हावें इ० अन्वय. ४ खडीसाखर. ५ अमृत. ६ स्वर्गांत. ७ कित्येक वेळां. ८ अगा जीवा !

मूल.

वज्रं पापमहीभृतां भवगदोद्रेकस्य सिद्धौषधं
मिथ्याज्ञाननिशाविशालतमसस्तिग्मांशुबिम्बोदयः।
क्रूरक्लेशमहीरुहामुरुतरज्वालाजटालः शिखी
द्वारं निर्वृतिसद्मनो विजयते कृष्णेति वर्णद्वयम्॥८॥

छाया.

संसारार्तिवरी रसायन, महत् पापाद्रिचें वज्र जें *
क्रूरक्लेशतरूस उग्र वणवा, मोक्षालयद्वार जें ।
गाढाज्ञानतमोविलासनिकरा चण्डांशुबिंबोदय
ऐसें अद्भुत शोभतें त्रिभुवनीं कृष्णाख्य वर्णद्वय ॥ ८ ॥

मूल.

रे चेतः कथयामि ते हितमिदं वृन्दावने चारयन्
वृन्दं कोऽपि गवां नवाम्बुदनिभो बन्धु र्न कार्यस्त्वया ।
सौन्दर्यामृतमुद्गिरद्भिरभितः संमोह्य मन्दस्मितै-
रेष त्वां तव वल्लभांश्च विषयानाशु क्षयं नेष्यसि ॥९॥

छाया.

कोणी बाळ तमालसुंदर, मना, वृन्दावनीं चारितो
गोवृन्दें; करिं सख्य त्याशिं न कधीं, हें सत्य मी सांगतों !।

---

१ संसाररूप रोगावर. २ पापपर्वतांचें. *जें (कृष्णाख्य वर्णद्वय). ३ दुःसहायासरूप वृक्षास. ४ मोक्षमंदिराचें दार. ५ निबिड अज्ञानांधकाराच्या लीलेच्या समुदायाला. ६ सूर्याचा उदय. ७ कृष्ण नांवाचें. ८ अक्षरांची जोडी. ९ लहान मुलगा; कुमार. १० तमालवृक्षासारखा सुंदर. ११ अगा मना! १२ वृन्दावनामध्यें. १३ गाईचे कळप. हें 'चारितो' याचें कर्म.

सौन्दर्यामृत[1] वर्षतीं जणुं, अशा मन्दस्मितीं[2] मोहुनी
हीं तूतें प्रिय वस्तुलांहि तुझिया नाशील एके क्षणीं ॥ ९ ॥[3]

मूल.

अव्याख्येयां विचरति परां प्रीतिमन्तर्निमग्ना
कण्ठे लग्ना हरति नितरां याऽन्तरध्वान्तजालम् ।
तां द्राक्षाद्यैरपि बहुमतां माधुरीमुद्गिरन्तीं
कृष्णेत्याख्यां कथय रसने यद्यसि त्वं रसज्ञा ॥१०॥

छाया.

चित्तीं होतां[4] स्थिर, वितेरि[5] जें प्रेम तें वर्णवेना
कंठीं येतां, हृदयिं तिमिरीं[6] ठाव कोठें मिळेना ।
द्राक्षांनींही[7] अतिशय जिंची[8] माधुरी आदरावी
ती कृष्णाख्या[11] वदुनि, रसने ! नामसार्थक्य[12] दावी ॥१०॥

मूल.

सन्त्येवास्मिञ्जगति बहवः पक्षिणो रम्यरूपा-
स्तेषां मध्ये मम तु महती वासना चातकेषु ।
यैरध्यक्षैरथ निजसखं नीरदं स्मारयद्भि-
श्चित्तारूढं भवति किमपि ब्रह्म कृष्णाभिधानम् ॥११॥

---

१ सौन्दर्यरूप अमृत. २ मधुर हास्यांनीं. ३ ' हा ( बाल ) जणुं सौन्दर्यामृत वर्षतीं अशा मन्दस्मितीं ( तुला ) मोहुनी तूतें ( आणि ) तुझिया प्रिय वस्तुलांहि एके क्षणीं नाशील, ' असा अन्वय. ४ यांना 'जी' (कृष्णाख्या) हा अध्याहृत कर्ता. ५ देते. याला 'जी' (कृष्णाख्या) हा कर्ता आणि 'जें प्रेम' हें कर्म. ६ अज्ञानांधकाराला. ७ द्राक्षांनींसुद्धां. ८ ज्या [illegible] ९ [illegible] १० [illegible] करावी. ११ कृष्ण हें नांव. १२ रस जाणणारी ती रसना असा नांवाचा सार्थपणा.

छाया.

पक्षी होती विविध¹ भुवनामाजि सौन्दर्यखाणी²
माझें प्रेम प्रबल परि त्या चातकांच्या ठिकाणीं ।
ते देताति स्मरण करुनी प्राणदात्या⁴ घनाचें
तेणें येई सहजचि मनीं ब्रह्म कृष्णाख्य⁵ साचें ॥ ११ ॥

मूल.

विष्वद्रीच्या भुवनमखिलं भासते यस्य भासा
सर्वासामप्यहमितिविदां प्रत्ययालम्बनं यः ।
तं पृच्छन्ति स्वहृदयमनावेदिनो विष्णुमन्या-
नन्यायोऽयं शिव शिव नृणां केन वा वर्णनीयः ॥ १२ ॥

छाया.

ज्यांच्या⁶ तेजें भुवन सगळें होतसे भासमान⁷
जो ज्ञानाचें निरुपम⁸ असे आश्रयाचें ठिकाण ।
नेणोनीयां⁹ स्वहृदय¹⁰ जनीं विष्णु आहे कुठें तो¹¹ ?
कोणी पृच्छा¹² करिति असली; काय हा मोह होतो ! ॥१२॥

मूल.

सेवायां यदि साभिलाषमसि रे लक्ष्मीपतिः सेव्यतां
चिन्तायामतिसस्पृहं यदि तदा चक्रायुधश्चिन्त्यताम् ।
आलापं यदि वांछसि स्मररिपोर्गाथा तदालप्यताम्
स्वापं वाञ्छसि चेन्निरर्गलसुखे चेतः सखे सुप्यताम् ॥ १३॥

---

१ नानाप्रकारचे. २ अत्यंत सुंदर. ३ पराकाष्ठेचें. ४ जीवन देणाऱ्या. ५ कृष्णनांवाचें. ६ ज्या विष्णूच्या. ७ प्रकाशित. ८ सर्वोत्कृष्ट. ९ न जाणून; याचें कर्म 'स्वहृदय.' १० आपलें मन. ११ 'तो विष्णु कुठें आहे' इ. अन्वय. १२ प्रश्न.

छाया.

भजनिं रुचिं तरी त्या इन्दिरेशा भजावें
स्मरणिं रुचि तरी त्या चक्रिलांगी स्मरावें ।
स्तवनिं रुचि तरी तो कामशत्रु स्तवावा
स्वपनिं रुचि तरी तो स्वापं सद्रूपिं घ्यावा ॥ १३ ॥

मूल.

भवग्रीष्मप्रौढातपनिवहसंतप्तवपुषो
बलादुन्मूल्य द्राङ्निगडमविवेकव्यतिकरम् ।
विशुद्धेऽस्मिन्नात्मामृतसरसि नैराश्यशिशिरे
विगाहन्ते दूरीकृतकलुषमार्याः करटिनः ॥ १४ ॥

छाया.

भवंग्रीष्मोष्म्यानें विकलितंतनू आर्यकरि हा
बिडी अज्ञानाची झडकरि बळें तोडुनि, पहा ।
विशुद्धीं या ब्रह्मामृतसरसिं नैराश्यशिशिरीं
करि स्नाना, तेणें दुरितमल तो घालवि दुरी ॥ १४ ॥

मूल.

बन्धोन्मुक्त्यै खलु मखमुखान् कुर्वते कर्मपाशा-
नन्तःशान्त्यै मुनिशतमतानल्पचिन्तां भजन्ति ।
तीर्थे मज्जन्त्यशुभजलधेः पारमारोढुकामाः
सर्वं प्रामादिकमिह भवभ्रान्तिभाजां नराणाम् ॥ १५ ॥

---

१ आवड. २ लक्ष्मीकांताला, विष्णूला. ३ विष्णूला. ४ शिव. ५ निद्रेविषयीं. ६ निद्रा. ७ ब्रम्हस्वरूपामध्यें. ८ संसाररूप उन्हाळ्याच्या तापानें. ९ दुःखित झालें आहे शरीर ज्याचें असा. हें 'आर्यकरि' याचें विशेषण. १० साधुरूप हत्ती. ११ अत्यंत शुद्ध. हें 'ब्रम्हामृतसरसिं,' याचें विशेषण. १२ ब्रम्हज्ञानरूप जें अमृत त्याच्या सरोवरांत. १३ वैराग्यानें मोठें शीतल असा. हें 'ब्रह्मामृतसरसिं,' याचें विशेषण. १४ पापरूप मल किंवा चिखल. १५ आर्यकरी.

छाया.

मुक्तीसाठीं[1] मनुज करिती[2] कर्मपाश प्रयत्नें[3]
शान्तीसाठीं[4] मुनिजनमतीं[5] धुंडिती[6] ब्रह्म यत्नें ।
लंघायातें अशुभजलधि[7] स्नान तीर्थी करीती
कर्में ऐशीं अविमल[8] भवभ्रान्तिनें[9] आदरीती[10] ! ॥ १५ ॥

मूल.

प्रथमं चुम्बितचरणा जङ्घाजानूरुनाभिहृदयानि ।
आलिङ्ग्य भावना मे खेलतु विष्णोर्मुखाब्जशोभायाम् १६

छाया.

चरणा चुंबुनिया मग जंघांजानूरुनाभिहृदयांला[11]
आलिंगोनि करो मम विष्णु मुखांब्जांतरीं[12] विलासाला ॥ १६ ॥

मूल.

तरणोपायमपश्यन्नपि मामक जीव ताम्यसि कुतस्त्वम् ।
चेतःसरणावस्थां किं नागन्ता कदापि नन्दसुतः ॥ १७ ॥

छाया.

जीवा ! तरणोपाय न दिसे ह्मणुनि खिन्न होशि कां बहुत ।
आविर्भूत[13] न होइल काय कधींही मनांत नन्दसुत[14] ॥ १७ ॥

मूल.

श्रियो मे मा सन्तु क्षणमपि च माद्यद्गजघटा-
मदभ्राम्यद्भृङ्गावलिमधुरझंकारसुभगाः ।

---

१ मोक्षाकरितां. २ कर्मरूप पाश तयार करतात. ३ मोठ्या कष्टानें. ४ (मनाला) शांति मिळावी ह्मणून. ५ मुनिजनांच्या (विविध) मतांमध्यें. ६ ब्रह्म शोधतात. ७ पापसमुद्र. ८ अमंगल; अशुभ. ९ संसारभ्रमानें. १० स्वीकारतात; करतात. ११ पोटऱ्या, गुडघे, मांड्या, नाभि आणि हृदय यांना. १२ मुखकमलांत. १३ प्रकट. १४ श्रीकृष्ण.

निमग्नानां यासु द्रविणरसपर्याकुलदृशां
सपर्यासौकर्यं हरिचरणयोरस्तमयते ॥ १८ ॥

छाया.

मंदातें[1] प्राशोनी अलि[2] मधुर झंकार[3] करिती
सभोंतीं[4] ज्यांच्या, ते करिवर[5] गृहद्वारिं झुलती ।
नको ऐशी लक्ष्मी[6] मज; तिजवरी यन्मति[7] जडे
अनायासें त्याला न कधिं हरिचें सेवन घडे ॥ १८ ॥

मूल.

किं निःशङ्कं शेषे शेषे वयसः समागतो मृत्युः ।
अथवा सुखं शयीथा निकटे जागर्ति जान्हवी जननी ॥१९॥

छाया.

इतुक्या वृद्धपणीं कां निजशी निःशंक? पातला काळ[8]
अथवा सुखें निजावें! जननी भागीरथी उभी जवळ!! ॥१९॥

मूल.

संतापयामि किमहं धावंधावं धरातले हृदयम् ।
अस्ति मम शिरसि सततं नन्दकुमारः प्रभुः परमः ॥२०॥

छाया.

धावाधाव करुनि मी भूतलिं हृदया किमर्थ तापवितों ।
सतत प्रभु, नंदाचा नंदन[9], मम मस्तकावरी वसतो ॥ २० ॥

मूल.

रे रे मनो मम मनोभवशासनस्य
पादाम्बुजद्वयमनारतमामनन्तम् ।

---

१ (मदोन्मत्त हत्तीच्या गण्डस्थलांतून वाहणाऱ्या) मदाला, पाण्याला. २ भ्रमर; भृंगे. ३ झंकार शब्द करितात. ४ ज्या करिवरांच्या सभोंवतीं. ५ गजश्रेष्ठ. ६ वैभव. ७ ज्याचें मन. ८ मृत्यु. ९ कृष्ण. १० मुळमा.

किं मां निपातयसि संसृतिगर्तमध्ये
नैतावता तव गमिष्यति पुत्रशोकः ॥ २१ ॥

छाया.

रे रे मना, बघ मनोभवशासनाचें[1]
मी वंदितों सतत अंघ्रिसरोज[2] साचें ।
कां लोटितोसि भवसागरिं हाय हाय !
तेणें तुझा तनयशोक[3] निवेल काय ? ॥ २१ ॥

मूल.

मरकतमणिमेदिनीधरो वा
तरुणतरस्तरुरेष वा तमालः ।
रघुपतिमवलोक्य तत्र दूरा-
दृषिनिकरैरिति संशयः प्रपेदे ॥ २२ ॥

छाया.

मरकतमणिचद्ध[4] होय शैलें[5]
तरु अथवा परिपुष्ट हा तमाल[6] ।
दुरुनि रघुपतीस पाहुनीया ॥
ऋषिजन चित्तिं करीति कल्पना या ॥ २२ ॥

मूल

तरणितनया किं स्यादेषा न तोयमयी हि सा
मरकतमणिज्योत्स्ना वा स्यान्न सा मधुरा कुतः ।
इति रघुपतेः कायच्छायाविलोकनकौतुकै
र्वनवसतिभिः कैः कैरादौ न संदधिरे जनैः ॥ २३ ॥

---

१ स्मरमथनाचें; शिवाचें. २ चरणकमल. ३ मुलाचा शोक. ४ मरकताच्या मण्यांनीं खचलेला. ५ पर्वत. ६ अथवा हा परिपुष्ट तमाल तरु होय ? इ. अन्वय.

छाया.

तरणितनया[1] ही आहे कीं ? न; वारि तदन्तरीं[2]
मरकतमणिज्योत्स्ना[3] किंवा ? न; तींत न माधुरी[4] ॥
प्रथम गमला कोणा कोणा न संशय हा असा
मुनिजनीं[5], जयां[6] रामच्छायाविलोकनलालसा[7] ॥ २३ ॥

मूल.

चपला जलदाच्च्युता लता वा
तरुमुख्यादिति संशये निमग्नः ।
गुरुनिःश्वसितैः कपिर्मनीषी
निरणैषीदथ तां वियोगिनीति ॥ २४ ॥

छाया.

घनापासूनी कीं धरणिवरि ही वीज पडली ?
अहो वेली किंवा तरुवर[8] भुजांतोनि[9] गळली ? ।
अशी येई शंका प्रबळतम त्या[10] वानरमनीं
गुरुश्वासांनीं[11] तो मानिं समजला ही[12] विरहिणी[13] ॥ २४ ॥

मूल.

भूति र्नीचगृहेषु विप्रसदने दारिद्र्यकोलाहलः।
नाशो हन्त सतामसत्पथजुषामायुः समानां शतम्।

---

१ सूर्याची मुलगी; यमुना. २ तिच्यामध्यें. ३ मरकत मण्यांची प्रभा. ४ गोडी. ५ (आश्रमवासि) ऋषिमंडळींत. 'प्रथम मुनिजनीं हा असा (वरील दोन चरणांमध्यें निर्दिष्ट केलेला रामचंद्रविषयक) संशय कोणा कोणा न गमला;' असा अन्वय. ६ ज्या मुनिजनाला. ७ रामचंद्राची अंगकान्ति पाहण्याची उत्कंठा. ८ मोठ्या झाडाच्या खांद्यांवरून. ९ वळकट. १० रामायणप्रसिद्ध, शाहण्या, अथवा स्वामिकार्यकुशल अशा मारुतीच्या मनामध्यें. ११ दीर्घ उसाशांवरून. १२ जानकी. १३ पतीपासून दूर झालेली.

दुर्नीतिं तव वीक्ष्य कोपदहनज्वालाजटालोऽपि सन्
किं कुर्वे जगदीश यत्पुनरहं दीनो भवानीश्वरः।२५।

छाया.

लक्ष्मी नीचगृहीं दिसे; द्विजगृहीं दारिद्र्य मोठें वसे
होती साधु विनष्ट सत्वरिं, खलां आयुष्य सारें असे ।
हा अन्याय तुझा बघोनि करपे क्रोधाग्निनें अन्तर
देवा ! काय करूं खरेंच, पडलों मी दीन ! तूं ईश्वर ! ! ॥२५॥

मूल.

आमूलाद्रत्नसानो र्मलयवलयितादा च कूलात्पयोधे-
र्यावन्तः सन्ति काव्यप्रणयनपटवस्ते विशङ्कं वदन्तु ।
मृद्वीकामध्यनिर्यन्मसृणरसझरीमाधुरीभाग्यभाजां
वाचामाचार्यतायाः पदमनुभवितुं कोऽस्ति धन्यो मदन्यः२६

छाया.

मेरूपासुनि थेट सागरतटापर्यंत जे जाणते
कोणी होति कवी तयांस पुसतों; सांगोत निःशंक ते ।
राहे जींत खरोखरीच नखरा द्राक्षांतल्या गोडिचा
आहे कोण मदन्य धन्य भुवनीं आचार्य त्या वाणिचा ? ॥२६॥

मूल.

गिरां देवी वीणागुणरणनहीनादरकरा
यदीयानां वाचाममृतमयमाचामति रसम् ।
वचस्तस्याकर्ण्य श्रवणसुभगं पण्डितपते-
रधुन्वन् मूर्धानं नृपशुरथवायं पशुपतिः ॥ २७ ॥

---

१ संपत्ति. २ अधम लोकांच्या घरांत. ३ शंभर वर्षांचें. ४ मन. ५ गरीब, लाचार, पंगू. ६ समर्थ. ७ मेरुपर्वतापासून. * पंडित, ज्ञाते. ८ माझ्याशिवाय दुसरा. ९ प्रभु, स्वामी, मालक, धनी. १० भाषेचा.

छाया.

*जयाचे आलाप श्रवणिं पडतां फार मधुर
न वाग्देवी प्रेमें फिरवि निजवीणेवरि करें ।
कवीन्द्राच्या ऐशा ललितवचनांनीं न डुलती
जनां त्या मानावें मनुजपशु किंवा पशुपती ! ॥ २७ ॥

मूल.

मद्वाणि ! मा कुरु विषादमनादरेण
मात्सर्यमग्नमनसां सहसा खलानाम् ।
काव्यारविन्दमकरन्दमधुव्रताना-
मास्येषु धास्यतितमां कियतो विलासान् ॥२८॥

छाया.

दुर्बुद्धिनें खलें अनादरिती ह्मणोनी
हे वाणि ! अल्पहि न खेद मनांत मानीं ।
काव्यारविंदमधुचे अलि होति, लोकीं
होतील तन्मुखिं विलास बहू तुझे कीं ! ॥ २८ ॥

मूल.

मधु द्राक्षा साक्षादमृतमथ वामाधरसुधा
कदाचित्केषांचिन्न खलु विदधीरन्नपि मुदम् ।

---

* ज्या कवीन्द्राचे. १ कानांवर आले असतां; ऐकूं आले तेव्हां. २ सरस्वती. ३ आपल्या वीणेवर. ४ कर फिरवि इ. अन्वय. ५ कवि-श्रेष्ठाच्या; अर्थात् पंडितराजाच्या. ६ सुंदर वचनांनीं. ७ डोलतात; मान हलवितात किंवा तुकवितात. ८ माणसाच्या रूपाचीं जनावरें. ९ शिव. १० दुष्ट लोक. ११ अपमान करितात; याचें ' तुला ' हें अध्याहृत कर्म. १२ हे ( माझे प्रिय ) वाचे, अर्थात् कविते ! १३ काव्यरूपकमलांतील रसाचे. १४ भृंग. १५ अलींच्या मुखांत.

ध्रुवं ते जीवन्तोऽप्यहह मृतका मन्दमतयो
न येषामानन्दं जनयति जगन्नाथभणितिः ॥ २९ ॥

छाया.

मधु[1], द्राक्षा[2], साक्षात्[3] अमृत, तशि वामाधरसुधा[4]
कदाचित् कोणाचें न करितिलही रंजन कदा ।
मला[5] वाटे चित्तीं जन मृतचि तो, यद्यपि जिता,
जयाच्या चित्ताला रमवि न जगन्नाथकविता ॥ २९ ॥

मूल.

निर्माणे यदि मार्मिकोऽसि नितरामत्यन्तपाकद्रव-
न्मृद्वीकामधुमाधुरीमदपरीहारोद्धुराणां गिराम् ।
काव्यं तर्हि सखे सुखेन कथय त्वं संमुखे मादृशां
नो चेद्दुष्कृतमात्मना कृतमिव स्वान्ताद्बहिर्मा कृथाः॥३०॥

छाया.

द्राक्षापाक रसाळही बहु फिका ज्याच्यापुढें वाटतो
ऐसें काव्य करावया चतुरता अभ्यासही लागतो ।
रे अंगीं असतील हे[6] गुण तरी काव्या तुझ्या आयकों[7]
त्यातें[8], नातरि[9] आत्म[10]दुश्चरितसें बाहेर काढूं नको ! ॥ ३० ॥

मूल.

धुर्यैरपि माधुर्ये द्राक्षाक्षीरेक्षुमाक्षिकसुधानाम् ।
वन्द्यैव माधुरीयं पण्डितराजस्य कवितायाः ॥ ३१ ॥

---

१ मध. २ द्राक्षें. ३ प्रत्यक्ष. ४ तरुणींचें अधरामृत. ५ 'तो जन यद्यपि जिता (तथापि) मला चित्तीं मृतचि वाटे.' असा अन्वय. ६ चातुर्य व अभ्यास हे गुण. ७ (आम्ही) ऐकूं. ८ त्या काव्याला ९ नाहीं तर. १० आपण केलेल्या पापाप्रमाणें.

छाया.

द्राक्षें, माक्षिक[1], इक्षु[2], सुधा[3], हीं द्रव्यें फाराचि गोड ।
कविरायांची[4] काव्यमाधुरी[5] करी त्यांवरि[6] तोडें[7] ॥ ३१ ॥

मूल.

शास्त्राण्याकलितानि नित्यविधयः सर्वेऽपि संभाविता
दिल्लीवल्लभपाणिपल्लवतले नीतं नवीनं वयः ।
संप्रत्युज्झितवासनं मधुपुरीमध्ये हरिः सेव्यते
सर्वं पण्डितराजराजितिलकेनाकारि लोकाधिकम् ॥३२॥

छाया.

शास्त्रें आकळिलीं[8], विधीहि सगळे ते नित्यचे पाळिले
दिल्लीपोलरूपविलासभवनीं[9] तारुण्यही काढिलें ।
आतां सोडुनि वासना मधुपुरीमाजी[10] हरी सेवितो
ऐशा अद्भुत सर्व गोष्टि करिता झाला कविश्रेष्ठ[11] तो ॥३२॥

मूल.

दुर्वृत्ता जारजन्मानो हरिष्यन्तीति शंकया ।
मदीयपद्यरत्नानां मञ्जूषैषा कृता मया ॥ ३३ ॥

छाया.

दुराचारी जारजन्मे[12] हरितील[13] म्हणोनियां[14] ।
केली असे ही मंजूषा[15] पद्यरत्नार्थ[16] माझिया ॥ ३३ ॥

---

१ मध. २ ऊंस. ३ अमृत. ४ जगन्नाथपंडिताची. ५ काव्याची गोडी. ६ वरच्या चरणांत सांगितलेल्या पदार्थांवर. ७ ताण. ८ संपादन केलीं, पढला. ९ दिल्लीच्या बादशहाच्या कृपेच्या क्रीडामंदिरामध्यें. १० मधुरेंत. ११ जगत्प्रसिद्ध पंडितराय. १२ जारापासून जन्मलेले. १३ चोरून नेतील; आपलींच म्हणून जगांत सांगतील. १४ अशा भीतीनें. १५ पेटी. १६ कवितारूप रत्नें ठेवण्याकरितां.

# परिशिष्ट पहिलें.

( शृंगारविलासांतील भाषान्तर न केलेलीं पद्यें. )

वदरामलकाम्रदाडिमाना-
मपहृत्य श्रियमुन्नतां क्रमेण ।
अधुना हरणे कुचौ यतेते
दयिते ते करिशावकुंभलक्ष्म्याः ॥ १ ॥

नीवीं नियम्य शिथिलामुषसि प्रकाश-
मालोक्य वारिजदृशो नयनं जिहासोः ।
नैवावरोहति कदापि च मानसान्मे
नाभेः प्रभा सरसिजोदरसोदरायाः ॥ २ ॥

वक्षोजाग्रं पाणिनास्पृश्य दूरं
यातस्य द्रागाननाब्जं प्रियस्य ।
शोणाग्राभ्यां भामिनी लोचनाभ्यां
जोषं जोषं जोषमेवावतस्थे ॥ ३ ॥

गुरुमध्यगता मया नतांगी
निहता नीरजकोरकेण मन्दम् ।
दरकुण्डलताण्डवं नतभ्रू-
लतिकं मामवलोक्य घूर्णितासीत् ॥ ४ ॥

दरानमत्कन्धरबन्धमीष-
न्निमीलितस्निग्धविलोचनाब्जम् ।
अनल्पनिःश्वासभरालसाङ्गं
स्मरामि संगं चिरमङ्गनायाः ॥ ५ ॥

रोषावेशान्निर्गतं यामयुग्मा-
देत्य द्वारं कांचिदाख्यां गृणन्तम् ।
मामाज्ञायैवाययौ कातराक्षी
मन्दं मन्दं मन्दिरादिन्दिरेव ॥ ६ ॥

कुचकलशयुगान्तर्मामकीनं नखाङ्कं
सपुलकतनु मन्दं मन्दमालोकमाना ।
विनिहितवदनं मां वीक्ष्य बाला गवाक्षे
चकितनतनताङ्गी सद्म सद्यो विवेश ॥ ७ ॥

विधाय सा मद्वदनानुकूलं
कपोलमूलं हृदये शयाना ।
तन्वी तदानीमतुलां बलारेः
साम्राज्यलक्ष्मीमधरीचकार ॥ ८ ॥

मुहुरर्थितयाद्य निद्रया मे
बत यामे चरमे निवेदितायाः ।
चिबुकं सुदृशो मृशामि याव-
न्मयि तावन्मुदिरोऽपि निर्दयोऽभूत् ॥ ९ ॥

श्रुतिशतमपि भूयः शीलितं भारतं वा
विरचयति तथा नो हन्त संतापशांतिम् ।
अपि सपदि यथायं केलिविश्रान्तकान्ता-
वदनकमलवल्गत्कान्तिसान्द्रो नकारः ॥ १० ॥

भुजपञ्जरे गृहीता नवपरिणीता वरेण रहसि वधूः ।
तत्कालजालपतिता बालकुरङ्गीव वेपते नितराम् ॥ ११ ॥

अकरुणहृदय प्रियतम मुञ्चामि त्वामितः परं नाहम्
इत्यालपति कराम्बुजमादायालीजनस्य विकला सा ॥ १२ ॥

औत्सुक्यात्परिमिलतां त्रपया संकोचमश्चतां च मुहुः ।
नवसंगमयो र्यूनो र्नयनानामुत्सवो जयति ॥ १३ ॥
गरिमाणमर्पयित्वा लघिमानं कुचतटात्सरोजदृशाम् ।
स्वीकुर्वते नमस्ते यूनां धैर्याय निर्विवेकाय ॥ १४ ॥
गुरुमध्ये हरिणाक्षी मार्तिकशकलै र्निहन्तुकामं माम् ।
रदयन्त्रितरसनाग्रं तरलितनयं निवारयांचक्रे ॥ १५ ॥
नयनाश्चलावमर्शं या न कदाचित् पुरा सेहे ।
आलिङ्गितापि जोषं तस्थौ सागन्तुकेन दयितेन ॥ १६ ॥
मानपराग्वदनापि प्रिया शयानेव दयितकरकमले
उद्वेल्लद्भुजमलसग्रीवाबन्धं कपोलमाधत्ते ॥ १७ ॥
अधिरजनि प्रियसविधे कथमपि संवेशिता गुरुभिः ।
किं भवितेति सशङ्कं पङ्कजनयना परामृशति ॥ १८ ॥

प्रभातसमयप्रभां प्रणयिनि न्हुवाना रसा-
दमुष्य निजपाणिना दृशममीलयल्लीलया ।
अयं तु खलु पद्मिनीपरिमलालिपाटच्चरै-
रेवरुदयमध्यगादधिकचारु तै र्मारुतैः ॥ १९ ॥
कपोलावुन्मीलत्पुलकनिकुरम्बौ मयि मनाङ्
मृशत्यन्तःस्मेरस्तबकितमुखाम्भोरुहरुचः ।
कथंकारं शक्याः परिगदितुमिन्दीवरदृशो
दलद्द्राक्षानिर्यद्रसभरसपक्षा भणितयः ॥ २० ॥

शयिता शैवलशयने सुषमाशेषा नवेन्दुलेखेव ।
प्रियमागतमपि सविधे सत्कुरुते मधुरवीक्षणैरेव ॥२१॥
विरहेण विकलहृदया विलपन्ती दयितदयितेति
आगतमपि तं सविधे परिचयहीनेव वीक्षते बाला॥२२॥

खिद्यति सा पथि यान्ती कोमलचरणा नितम्बभारेण ।
खिद्यामि हन्त परितस्तद्रूपविलोकनेन विकलोऽहम् ॥२३॥

केलीमन्दिरमागतस्य शनकैरालीरपास्येङ्गितैः
सुप्तायाः सरुषः सरोरुहदृशः संवीजनं कुर्वतः ।
जानन्त्याप्यनभिज्ञयेव कपटव्यामीलिताक्ष्या सखि
श्रान्तासीत्यभिधाय वक्षसि तया पाणिर्ममासञ्जितः २४

सुदृशो जितरत्नमालया
सुरतान्तश्रमबिन्दुमालया ।
अलिकेन च हेमकान्तिना
विदधे कापि रुचिः परस्परम् ॥ २५ ॥

जम्बीरश्रियमतिलंघ्य लीलयैव
व्यानम्रीकृतकमनीयहेमकुम्भौ
नीलाम्भोरुहनयनेऽधुना कुचौ ते
स्पर्धेते किल कनकाचलेन सार्धम् ॥ २६ ॥

अङ्गानि दत्त्वा हेमाङ्गि प्राणान् क्रीणासि चेन्नृणाम् ।
युक्तमेतन्नतु पुनः कोणं नयनपद्मयोः ॥ २७ ॥

जितमौक्तिकसंपदां रदानां
सहवासेन परां मुदं दधानाम् ।
विरसादधरीकरोति नासा-
मधुना साहसशालि मौक्तिकं ते ॥ २८ ॥

करिकुम्भतुलामुरोजयोः
क्रियमाणां कविभिर्विशृङ्खलैः ।

कथमालि शृणोषि सादरं
विपरीतार्थविदो हि योषितः ॥ २९ ॥

तिरस्कृतो रोषवशात् परिष्वज-
न्प्रियो मृगाक्ष्या शयितः पराङ्मुखः ।
किं दुःखितोऽसाविति कान्दिशीकया
कयाचिदाचुम्ब्य चिराय सस्वजे ॥ ३० ॥

चैलाञ्चलेनाननशीतरश्मिं
संवृण्वतीनां हरिदृश्वरीणाम् ।
व्रजाङ्गनानां स्मरजातकम्पा-
दकाण्डसंपातमियाय नीवी ॥ ३१ ॥

शयिता सविधेऽप्यनीश्वरा
सफलीकर्तुमहो मनोरथान् ।
दयिता दयिताननाम्बुजं
दरमीलन्नयना निरीक्षते ॥ ३२ ॥

वदनारविन्दसौरभलोभादिन्दिन्दिरेषु निपतत्सु ।
मय्यधरार्थिनि सुदृशो दृशो जयन्त्यतिरुषा परुषाः ॥३३॥

---

# परिशिष्ट दुसरें.

## ( अन्योक्तिविलास. )

अन्योक्ति या समासघटित पदामध्यें दोन शब्द आहेत. एक अन्य व दुसरा उक्ति. अन्य ह्मणजे अप्रस्तुत, अप्रकृत किंवा अवर्ण्य होय; आणि उक्ति ह्मणजे कथन किंवा वचन. तेव्हां अन्योक्ति ह्मणजे अप्रस्तुत, अप्रकृत, किंवा अवर्ण्य वस्तूचें कथन असा अर्थ झाला. अन्योक्तीला अप्रस्तुतप्रशंसा असें दुसरें नांव आहे. अप्रस्तुतप्रशंसा ह्मणजे अप्रस्तुताचें कथन. जेथें अप्रस्तुत वस्तूच्या वर्णनाचें पर्यवसान सादृश्यादिकांनीं प्रस्तुत वस्तूवर होतें तेथें अन्योक्ति अथवा अप्रस्तुतप्रशंसा हा अलंकार होतो. ' अप्रस्तुतप्रशंसा सा या सैव प्रस्तुताश्रया ' असें या अलंकाराचें मम्मटाचार्यांनीं लक्षण दिलें आहे. त्याचा अर्थ असाः—जेथें अप्रस्तुत व्यवहाराचें वर्णन प्रस्तुत विषयावर पर्यवसित होतें तेथें अप्रस्तुतप्रसंशा हा अलंकार जाणावा. वर दिलेल्या लक्षणावर आचार्यांनीं वृत्ति लिहिली आहे ती अशीः—' अप्राकरणिकस्याभिधानेन प्राकरणिकस्याक्षेपोऽप्रस्तुतप्रशंसा. ' अप्रस्तुताच्या वर्णनानें प्रस्तुताचें ग्रहण होतें त्या ठिकाणीं अप्रस्तुतप्रशंसा हा अलंकार होतो, असा या वृत्तीचा अर्थ आहे. रसगंगाधरकारांनीं अन्योक्तीचें लक्षण दिलें आहे तें असेः—' अप्रस्तुतेन व्यवहारेण सादृश्यादिवक्ष्यमाणान्यतमप्रकारेण प्रस्तुतव्यवहारो यत्र प्रशस्यते साऽप्रस्तुतप्रशंसा. ' याचा अर्थ वर दिलेल्या मराठी लक्षणांत तात्पर्यरूपानें आलाच आहे.

अन्योक्ति पांच प्रकारची आहे. एका प्रकारांत प्रस्तुत वस्तूची सादृश्यावरून प्रतीति होते; दुसऱ्यांत प्रस्तुत वस्तूची कार्यरूपानें

ग्रहण होतें; तिसऱ्यांत प्रस्तुतवस्तु कारणस्वरूपानें मनांत येते; चवथ्यांत प्रस्तुतवस्तु सामान्यरूपानें पर्यवसित होते; आणि पांचव्यांत प्रस्तुतवस्तु विशेषरूपानें उपस्थित होते.

प्रस्तुतविलासांतील पहिल्या पांच श्लोकांतील अन्योक्ति-स्वरूप व्यक्त करून दाखविलें आहे. पुढें विस्तरभयास्तव तसें केलें नाहीं. वाचकांनीं आपल्या कल्पनेनें पुढें येणाऱ्या अन्योक्ति बसवाव्या. यापुढें श्लोकक्रमानेंच टिपा दिल्या आहेत.

१. यांत मृगपतिरूप अप्रस्तुत वस्तूच्या कथनानें तत्सदृश पण्डितराजरूप प्रस्तुत वस्तूची प्रतीति झाली. यास्तव या ठिकाणीं सादृश्यमूलक अप्रस्तुतप्रशंसा हा अलंकार झाला. या पद्यांत आशीर्वाद् किंवा नमस्कार याच्या रूपानें मंगल केलेलें दिसत नाहीं. पण्डितराजरूप वस्तूचा निर्देश यामध्यें झालेला आहे. 'मदोन्मत्त करिकुल' या शब्दांनीं विलक्षणप्रति-भाशाली व्यासवाल्मीकिकालिदासभवभूति इत्यादि कवीन्द्र, 'करुणापात्र करिणी' या पदांनीं अनुकंपनीय कवयित्री, आणि 'निजबळें न्यून मृग' एणें करून क्षुद्र कवि यांचें ग्रहण होतें. 'मदो-न्मत्त करिकुल दिगन्ताला गेलें' यानें प्रतिभाशाली कवीन्द्रांची नामशेषता ध्वनित झाली. 'करिणी' या स्त्रीलिंगि पदावरून अनुकंपनीयता सुव्यक्त झाली. 'निजबळें न्यून मृग' यावरून मृगांची तुच्छता सूचित झाली. 'प्रखरनखलीला' यानें पा-ण्डित्यप्रकर्ष व्यंजित झाला. 'मृगपति प्रखरनखलीला कोठें दावी' यावरून पण्डितराजाच्या तोडीचा कवि उर्वीतलांत उरला नाहीं हें व्यंग्य प्रतीत झालें. क, ख, आणि ल या व्यंजनांची एकवार आवृत्ति आली आहे ह्मणून छेकानुप्रास हा शब्दालंकार झाला. र याची अनेकवार आवृत्ति आल्यामुळें वृत्यनुप्रासनामा शब्दालंकार झाला. यांत रस वीर; श्लोकाचें वृत्त शिखरिणी.

२. यांत द्विजेन्द्रकलहंसवृत्तान्त अप्रस्तुत आहे; तो पूर्वी संपन्न स्थितींत असलेल्या परंतु दैवदुर्विलसितानें प्रस्तुत विपन्न दशेस प्राप्त झालेल्या थोर पुरुषाच्या प्रस्तुत वृत्तांतामध्यें पर्यव-सित झाला आहे. 'कमलांतला पराग यज्जीवन सुगंध करी' या वाक्यानें मानससरोवराची समृद्धि व सौभाग्य हीं सूचित झालीं. मानससरोवरावर ब्रह्मदेवाचें अधिष्ठान आहे, यामुळें 'मानस' या शब्दानें त्या सरोवराचें पावित्र्य व उन्नतत्व हीं ध्वनित झालीं. पहिल्या दोन चरणांवरून पूर्ववय परमस्पृहणीय ऐश्वर्यांत निघून गेलें हा अर्थ सुव्यक्त होतो. 'प्रथम' याचा अर्थ पूर्वी असा घ्यावयाचा. 'द्विजेन्द्र' या पदानें कलहंसाचें व्यतिरेकानें इतर पक्ष्यांहून अधिक वैभवशालित्व द्योतित झालें. 'वसति केवि करी' इत्यादिकानें कलहंसाचें दैन्य अनुमित होतें. 'पल्वल' शब्दानें स्थल व जल या उभयतांचा संकोच व्यंजित होऊन स्थलाचा अधमपणाही गम्यमान झाला. 'मलिन' या विशेषणानें पल्वलाचा निंद्यपणा स्पष्ट झाला. 'जमति ज्यांत भेकावली' यावरून पल्वाची दुर्दशा व विघ्नबहुलता हीं सूचित झालीं. ज आणि व यांची एकवार आवृत्ति आल्यामुळें छेकानुप्रास झाला. पूर्वी ज्यानें ऐश्वर्य उपभोगिलें त्याला पुढें दैन्य हें अत्यंत कष्टप्रद होतें हें व्यंग्य या पद्यांत आहे. 'जीवन' अशी वर्णांची क्रमानें आवृत्ति झाल्यामुळें यमकालंकार झाला. रस करुण; वृत्त पृथ्वी.

३. यांत विधि आणि विधु यांची गोष्ट अप्रस्तुत आहे. तिच्यावरून विनाशोद्युक्त खल आणि नवीन अभ्युदय पावणारा पुरुष यांची गोष्ट प्रस्तुतत्वानें उपस्थित होते. 'तृष्णाचंचल' या पदानें चकोरवधूंचें अनन्यगतिकत्व सूचित होतें. 'चकोरक-

वधू' एणेंकरून अत्यंत अनुकंपार्हत्व ध्वनित झालें. 'प्राचीकडे पाहतां' यावरून नवचंद्राविषयीं उत्कण्ठा व्यक्त झाली. 'हंसतां' या पदानें पद्मांची प्रफुल्लता स्पष्ट झाली. जो अनंग आहे त्याला कार्य करणें संभवत नाहीं. आणि येथें तर अनंग धनुष्टंकाररूप कार्य करीत आहे. अनंग हा शब्द जरी योगरूढ आहे तरी त्याचें अनंगत्व ह्मणजे निरङ्गत्व यौगिकत्वानें मनांत येतें ह्मणून येथें विभावनालंकाराचा ध्वनि झाला असें समजावें. 'धनुचा टंकारही काढितां' यानें त्या कालाची कामोद्दीपकता व्यक्त झाली. 'मानवती' शब्दानें कलहान्तरिता नायिका व्यंजित झाली. 'मान प्रस्थानोत्सुक होत असतां' यावरून नायिकाची रमणोत्कण्ठा प्रतीत झाली. शेवटच्या चरणानें विधात्याची अननुरूपकार्यप्रवृत्ति सूचित झाली. छेकानुप्रास आणि वृत्त्यनुप्रास हे शब्दालंकार यांत आहेत. पहिल्या तीन चरणांत शृंगार व चवथ्यांत करुण रस आहे. वृत्त शार्दूलविक्रीडित.

४. यांत कमलादिकांच्या अप्रस्तुत वृत्तान्तानें आपल्या संपन्न यजमानाची कीर्ति निरपेक्ष पसरणाऱ्या आश्रिताची स्तुति वर्णित झाली. 'मधुर' शब्दानें मरंदाचें प्राशनार्हत्व व्यक्त झालें. 'स्वेच्छ' पदानें मरंदाचें वैपुल्य ध्वनित झालें 'मंजु ताना घेवोत' एणें करून अलींचा हर्षातिरेक ध्वनित होऊन कमलांची स्तुतिही व्यंजित झाली. 'कांहीं निराळा' ह्मणजे अगदीं अलौकिक. पवनाचें अन्यत्वानें ह्मणजे अलौकिकबंधुत्वानें येथें वर्णन झालें ह्मणून भेदकातिशयोक्तिनामा अलंकार झाला. छेकानुप्रास शब्दालंकार. शांत रस. मालिनी वृत्त.

५. यांत कुटज आणि मधुकर यांच्या अप्रस्तुत गोष्टीनें कोणा एका धनिकाजवळ राहणारा गुणी मनुष्य दैवयोगानें

हलक्या माणसाकडे प्राप्त झाला असतां तो त्याचा अपमान करूं लागला इत्यादि गोष्ट प्रस्तुतत्वेंकरून कथित झाली. 'दैवें' या पदानें मधुकराचें आदरणीयत्व सूचित झालें. 'कुटजा' या संबोधनानें त्या वृक्षाचा अधमपणा व्यंजित झाला. 'रसपूर्ण' या पदानें कमलिनींची विदग्धता व उपभोगार्हत्व हीं ध्वनित झालीं. 'कमलिनी' या स्त्रीलिंगिपदानें मधुकरावर अनुरक्त होण्याची त्यांची नैसर्गिक पात्रता व्यक्त झाली. 'मधुकर' पदानें भ्रमराचें गुणशालित्व; व मधुकर या एकवचनानें व कमलिनींच्या बाहुल्यानें मधुकराची प्रौढता, विलासशालिता व असाधारण उपभोगार्हता हीं गम्यमान झालीं. माननीयांचा मान ठेवणें अवश्य व योग्य होय हें या श्लोकांतील व्यंग्य आहे. निःसीम आदरानें कमलिनींचा मधुकरविषयक प्रेमातिरेक सूचित झाला. 'न दावि अवमान' या वाक्यगत अर्थाला 'रसपूर्ण कमलिनी त्या (निःसीम) आदर दाविती' हा वाक्यार्थ हेतुभूत झाला; ह्मणून येथें काव्यलिंग अलंकार झाला. करुणरस. छेकानुप्रास आणि यमक हे शब्दालंकार. वृत्त गीति.

६. 'रसालतरुवरि रसिकवर भृंगसंघ जमतिल' यानें अनुरूपवस्तुसंयोग सूचित झाला. 'नीरस' पदानें विहारराहित्य व कोकिलाची विमनस्कता हीं व्यंजित झालीं. 'विपिनांतरिं' यानें एकांतवास ध्वनित झाला. 'नीरस दिन कंठावे' इत्यादिकांनीं 'डोळे मिटून चार दिवस काढ,' अशा लोकप्रवादाची अनुकृति झाली ह्मणून लोकोक्तिनामक अलंकार झाला.'तंवर' पदानें कोकिलाच्या विपन्नावस्थेचें भंगुरत्व सूचित झालें. धैर्य धरून संकटाचे चार दिवस कसे तरी कंठावे असा भाव. आम्रांचा विकास झाला ह्मणजे तुला यथेच्छ मकरंद

मिळेल हें व्यंग्य. छेकानुप्रास व यमक हे शब्दालंकार. शान्त रस. छंद गीति.

७. घटाला फांस घालून दोर विहिरींत सोडतात हें कूपाचें गुणग्रहण झालें. प्रथमार्धांतील अर्थाला द्वितीयार्धांतील अर्थ हेतु-भूत आहे; यास्तव काव्यलिंग अलंकार झाला. शान्त रस; छंद गीति.

८. 'बक' या पदाच्या कठोर ध्वनीनेंच बकाचें अधमत्व व्यंजित झालें. 'परिणतमकरन्दमर्मवेत्ते' या पदानें भ्रमरांची कमलिनीभोगार्हता सूचित झाली. 'भ्रमर चिरायु असोत' यानें वक्त्याची कमलिनीविषयींची अनुकंपा ध्वनित झाली. पहिल्या अर्धांत विषाद करूं नको असें सुचवून दुसऱ्या अर्धांत त्याचा हेतु उपन्यस्त केला आहे म्हणून काव्यलिंग अलंकार. छेकानुप्रास. पुष्पिताग्रा वृत्त. करुण रस.

९. पूर्वार्धानें मधुकराचें विलासशालित्व व उन्नति हीं स्पष्ट झालीं. उत्तरार्धानें त्याची विपन्नावस्था सूचित झाली. 'रस-परिपूर्ण' व 'प्रफुल्ल' या हेतुगर्भ कमलविशेषणांनीं परिकरा-लंकार झाला. 'मधुकर' या विशेष्यपदाच्या यौगिक अर्थावरून जर त्यांतही हेतु कल्पिला तर परिकरांकुरालंकारध्वनि होईल. द्वितीयार्धानें वक्त्याची मधुकरविषयक साश्चर्यखिन्नता व्यंजित झाली. छेकानुप्रास; करुण रस; छंद गीति.

१० 'कवण वर्णाया शके' इत्यादिकानें महिम्याचें निःसीमत्व स्पष्ट झालें. 'मुखानें गरल टाकिति' यानें भुजंगांचें सर्वथात्या-ज्यत्व सूचित झालें. 'गंधभरें' या पदानें चंदनाचे अपकार करणाराविषयीं सुद्धां परमकारुणिकत्व ध्वनित झालें. प्रथमार्धांत

चन्दनाचें माहात्म्य अनिर्वचनीय आहे हें सांगून पुढच्या अर्धांत त्याचें कारण सांगितलें आहे ह्मणून काव्यलिंग अलंकार. वृत्यनुप्रास शब्दालंकार. शान्त रस. गीतिच्छंद.

११. 'खण्डुनि चूर्णीति' या पदांनीं निर्घृणत्वाची परमसीमा द्योतित झाली. 'तयांहि गंधें सुखविशि' एणेंकरून चंदनाची निसर्गरमणीय करुणापरता व्यक्त झाली. 'तव क्रम आदरायाला कवण शक्त असे' इत्यादिकानें चंदनाचें अलौकिक उपकारित्व ध्वनित झालें. 'चूर्णिति तुज' याबद्दल 'चुरिति तुला' हा पाठ कल्पावा. काव्यलिंग अलंकार. शान्त रस. गीतिच्छंद.

१२. 'कवण दुजा कुलव्रत अखंड पाळील' इत्यादिकानें हंसाचें नीरक्षीरविवेचकत्व अनन्यसाधारण आहे हें सूचित झालें. शांत रस. गीतिच्छंद.

१३. 'असिधारेसम तीव्र' आणि 'क्रूर भुजंगेंद्रतुल्य वरि दिसती' हा पूर्णोपमालंकार झाला. कारण पहिल्यांत उपमान 'असिधारा,' उपमेय 'थोरजन,' सामान्य धर्म 'तीव्रता' आणि वाचकपद 'सम' हीं उक्त आहेत; तशींच दुसऱ्यांत 'भुजंगेंद्र' हें उपमान; 'थोर जन' हें उपमेय; 'क्रौर्य' हा सामान्य धर्म; आणि 'तुल्य' हें वाचकपद उक्त आहे. 'द्राक्षाहुनि अधिक गोड' यांत द्राक्ष या उपमानापेक्षां 'थोरजन' या उपमेयाचें अंतर्गत माधुर्यासंबंधानें आधिक्य वर्णित झालें ह्मणून येथें व्यतिरेकालंकार झाला. 'भूमि भूपविती' एणेंकरून थोरजनांची धन्यता प्रकट झाली. या पद्यांत साधुचरित्रवर्णन झालें ह्मणून स्वभावोक्ति. छेकानुप्रास शब्दालंकार. शांत रस. गीतिच्छंद.

१४. चवथ्या अन्योक्तीमधील अर्थ वेगळ्या रीतीनें या अन्योक्तींत आला आहे. 'स्वच्छन्दें लुटुनी' या पदांनीं मरन्दाची विपुलता सूचित झाली. 'अमन्द गावोत' एणेंकरून अलींचा आनंदातिशय द्योतित झाला. 'स्मित' शब्दानें कमलांचें सौभाग्य व रसपरिपूर्णता हीं व्यक्त झालीं. 'पवनाविणें कोणीही समर्थ न' यावरून पवनाचा अनन्यसाधारण उत्कर्ष ध्वनित झाला. शांत रस, प्रहर्षिणी वृत्त.

१५. 'संतापाकुल' या शब्दानें पांथांचें परम दैन्य सूचित झालें. 'कोणाकडे पाहिल' यानें अन्यदात्याचा अभाव व कासाराची पांथविषयक करुणा हीं व्यंजित झालीं. 'सारखें झुरणिला लागे' यावरून कासाराचें नितांतमृदु अन्तःकरण ध्वनित झालें. 'जीवन' पदानें श्लेष सूचित झाला. 'वारिधि' या हेतुगर्भ विशेष्याच्या सामर्थ्यानें परिकरांकुर अलंकार झाला. वारिधींचा अधिक्षेप करून कासाराची धन्यता प्रतिपादन केली एणें; करून प्रतीप अलंकार झाला. छेकानुप्रास. पूर्वार्धांत करुण रस; उत्तरार्धांत वीर रस. शार्दूलविक्रीडित वृत्त.

१६. 'पतंग' शब्दानें हंस, सारस इत्यादि पक्षी घ्यावयाचे. पतंगांचें आकाशविहरण आणि भृंगसमुदायाचें आम्रमंजरींवर अधिष्ठान या त्या पक्ष्यांच्या स्वभावसिद्ध क्रिया आहेत. त्यांचें वर्णन झाल्यामुळें स्वभावोक्ति अलंकार झाला. 'पद्माकरा' पदानें सरोवराची संपन्नता व्यक्त झाली. शेवटच्या चरणानें मीन अनन्यगतिक असल्यामुळें सर्वथा अनुपेक्षणीय आहे हें ध्वनित झालें, 'दीन,' आणि 'गतिहीन' या हेतुगर्भ विशेषणांनीं परिकरालंकार झाला. वृत्त्यनुप्रास आणि छेकानुप्रास. करुण रस. वसन्ततिलका वृत्त.

१७. पूर्वार्धांत पूर्णोपमालंकार. 'जनतोपास्त्वचि' यानें मारुताची निरपेक्ष लोकरंजनदीक्षा सुव्यक्त झाली. मारुत अनादरणीय नव्हे हें तात्पर्य. यमकालंकार. शांत रस. छंद गीति.

१८. 'मंजुल गुंजत असतां' एणेंकरून अलीचें संलापचातुर्य सूचित झालें. 'मौन न धरीं' इत्यादिकावरून नायिकेचें मुग्धत्व ध्वनित झालें. 'मौन' आणि 'शिरीं' यांच्या लाक्षणिक अर्थांवरून श्लेष व्यंजित होतो. प्रथमार्धांतील वाक्यार्थाला द्वितीयार्धांतील वाक्यार्थ हेतुभूत असल्यामुळें काव्यलिंग अलंकार झाला. छेकानुप्रास व वृत्यनुप्रास हे शब्दालंकार. रस शृंगार. वृत्त गीति.

१९. 'उन्नति किति वानावी' इत्यादिकानें पाटीराची स्तुतिरूपानें निन्दा झाली यास्तव व्याजस्तुति अलंकार झाला. करुण रस; गीतिच्छंद.

२०. 'सुर' शब्दानें तरुकुसुमांचें पावित्र्य व उत्कृष्टत्व हीं द्योतित झालीं. 'अन्य गंध लाजवी' यावरून अन्य गंधांचा धिक्कार झाला आणि सुरतरुकुसुमांचा उत्कर्ष सूचित झाला; यास्तव प्रतीपालंकार झाला. 'षट्पदा' यानें निन्दा गम्यमान झाली. 'तुझी धन्य' एणेंकरून व्याजोक्ति अलंकार झाला. गीतिच्छंद.

२१. 'विंध्यकन्यके' एणेंकरून तटिनीचें उच्चकुलजन्म सूचित झालें. 'विंध्यकन्यके' आणि 'पावने' या हेतुगर्भ विशेषणसामर्थ्यानें परिकरालंकार. 'रथ्या' शब्दानें त्यांतील जलाचें मालिन्य व दुर्गंधीपणा हीं सूचित झालीं. रस्त्यांतील पाणी घेणें हें कर्म जीवनसंकट प्राप्त झालें तरी देखील तुला अत्यंत अनुचित

असा भाव. थोर लोक प्राणहानि होण्याचा प्रसंग आला तरी आपला थोरपणा सोडीत नाहींत हें व्यंग्य. गीतिच्छंद.

२२. ' नोहे फल, नोहें दल, नोहे सुम, ' यांनीं केवळ गुणांचा अभाव प्रकट केला. ' भंवति कांटे ' या पदांनीं दोषाकुलता व्यक्त झाली. ' वैभव ' पदानें व्याजोक्ति स्फुट झाली. ' जवळि याव-या लाज वाटे ' इत्यादिकानें बाभळीच्या समागमाची दुष्टता व विफलता हीं निश्चित झालीं. फलदलसुमहीनता, कंटकावृतता एतदर्थक हेतुगर्भ विशेषणपदांनीं परिकरालंकार झाला. छेका-नुप्रास व वृत्यनुप्रास शब्दालंकार. छंद गीति.

२३. ' विपिनीं ' या पदानें संकट प्राप्त झालें असतां कोकि-लाच्या मदतीला कोणी स्वजन धावून येण्याचा मुळींच संभव नाहीं हें सूचित झालें. ' समजातीय समजुनी ' येथें सजातीयाविषयीं भ्रान्ति ह्मणून भ्रांतिमदलंकार झाला. आपल्या भोंवतालचे लोक ओळखून त्याप्रमाणें वर्तनक्रम ठेवणें हें योग्य असा व्यंग्यार्थ. गीतिच्छंद.

२४ ' भवानीपित्या ! ' या पदानें हिमालयाचें महत्व सू-चित झालें. पूर्वार्धगत अर्थावरून हिमानीची दोषाकुलता व्यक्त झाली. ' पित्या ' या पदानें हिमालयाची अपत्यसंपन्नता, प्रौढ-वयस्कता आणि ह्मणूनच पार्वतीशिवाय अन्यस्त्रीच्या अभि-लाषाची अननुरूपता व्यंजित झाली. ' हिमानी ' या स्त्रीलिंगि पदावरून, ' भवानीपित्या ' या पुल्लिंगी शब्दावरून आणि ' शिरावरि धरिशी ' या पदांच्या ' डोक्यावर नाचवितोस ' या अर्थान्तरसंभवावरून एकंदर अनुरक्त नायिकानायक यांचा अप्रस्तुत वृत्तांत स्फुरित झाला ह्मणून समासोक्त्यलंकार झाला. छेकानुप्रास शब्दालंकार. गीतिच्छंद.

२५. 'करिबाला' यांतील 'बाला' या पदानें कलभाची मूढता सूचित झाली. 'आला' यानें अप्रार्थित आगमन, आणि ह्मणूनच आदराची अवश्यकता हीं ध्वनित झालीं. उत्तरार्धानें अलीची संमानार्हता सुव्यक्त झाली. थोरांचें आगमन आदरणीय होय हें व्यंग्य. काव्यलिंग अलंकार. छेकानुप्रास. छंद गीति.

२६. 'देवद्रुमसुमगंधा' यांतील देवशब्दानें सुमगंधाचें अलौकिकत्व सूचित केलें. 'अन्यसुमीं' यांतील अन्य शब्दानें सुमाची अधमता व्यक्त केली. थोरानें हलकें काम करणें योग्य नव्हे असा भाव. छंद गीति.

२७. 'मधुपाला तव उपमा न लाभली' यावरून आम्राचा अनन्यसाधारण उत्कर्ष द्योतित झाला. 'पिकांस पुशिलें' यावरून पिकांचा रसिकपणा ध्वनित झाला. वृत्यनुप्रास आणि छेकानुप्रास. वृत्त गीति.

२८. 'ती कधि तरी असे शक्य' इत्यादिकानें वारिदाचें असामर्थ्य व्यक्त होऊन किंचित् अधिक्षेपही द्योतित झाला, ह्मणून प्रतीपालंकार. 'धो धो' यानें वारिदाची जलसंपत्ति स्फुट झाली. 'वर्षासमयिं' येणें करून पर्जन्यकालाहून अन्यकालीं वारिदाची गतश्रीकता सूचित झाली. आपत्कालीं अत्यल्पही साहाय्याची जी किंमत आहे ती अनुकूल कालांत मोठ्याही साहाय्याची नाहीं हें व्यंग्य. छेकानुप्रास. मंदक्रान्ता वृत्त. शान्त रस.

२९. 'मरुप्रांतांत' या पदानें संकटाचा अतिरेक दर्शविला. संहारहेतु असून संहारकार्य उक्त नाहीं ह्मणून विशेषोक्ति अलंकार. 'अवयाच' या हेतुगर्भ विशेषणानें परिकरांकुर अलंकार झाला. वांछितार्थापेक्षां अधिक अशा अमृतासिंचन

करणाऱ्या तोयदाचा लाभ झाल्यामुळें प्रहर्षणालंकार. छेकानुप्रास. शार्दूलविक्रीडित वृत्त.

३०. 'मदोन्मत्त करटी भीतीनें न निवसति' यावरून मृगपतीचा दर्प व विक्रम द्योतित झाला. 'करिवरविमुक्ता' यानें मृगपतीचा शौर्यातिरेक सूचित झाला. 'मुक्तामाला' पदानें मुक्तांचा अपरिमितपणा स्पष्ट झाला. 'परलोका जातांक्षणिंच' यानें क्षुद्रपशूंचा मृगपतीच्या मृत्यूनें उल्लास प्रदर्शित झाला. 'शिवा घोष करिती' या पदानें सिंहगुहेचें नितांतदैन्य ध्वनित झालें. वीर, करुण, भयानक आणि शान्त रस. छेकानुप्रास. शिखरिणी वृत्त.

३१. मालाकाराची करुणा ही कुसुमोद्गमाला कारण असते. ती नसतां प्रस्तुतस्थलीं कुसुमोद्गमरूप कार्य घडलें यास्तव विभावनालंकार झाला. दुसऱ्या दोन चरणांनीं बालवकुलाचा उत्कर्ष स्फुट झाला. शेवटल्या चरणानें कुसुमगंधाचें अद्वितीयत्व व प्राचुर्य हीं ध्वनित झालीं. यमक आणि छेकानुप्रास हे शब्दालंकार. वीर रस. शिखरिणी वृत्त.

३२. करुण रस. छेकानुप्रास. शार्दूलविक्रीडित वृत्त.

३३. दुसऱ्या चरणावरून चातकाला जलधराशिवाय अन्याचा आधार नाहीं हें सूचित झालें. जलाविषयीं अत्यंत उत्कंठित अशा चातकावर गारांची वृष्टि ही अननुरूप घटना झाली यास्तव विषमालंकार झाला. 'करुणाकरा' पदांत स्तुतीनें निंदा गम्य झाली ह्मणून व्याजस्तुति. छेकानुप्रास. करुण रस. शार्दूलविक्रीडित वृत्त.

३४. पहिल्या दोन चरणांनीं तरुवरांचें मेघपरायणत्व सूचित

केलें. तिसऱ्या चरणानें अंबुवाहाची अनुचितकर्मप्रवृत्ति स्फुटित झाली. संपत्तीच्या धुंदीनें सारासारविचार लुप्त होतो हें व्यंग्य. छेकानुप्रास. मालिनी वृत्त. करुण रस.

३५. ‘ हा ’ म्हणजे प्रत्यक्ष ऐकूं येणारा. ‘ पथिका ’ आणि ‘ अंबुद ’ या हेतुगर्भ विशेष्यपदांनीं परिकरांकुर अलंकार. ‘ भीति ’ म्हणजे अर्थात् वाटेंत मुक्काम होऊन प्रियेच्या विरहाची मर्यादा वाढण्याची. तिसऱ्या चरणावरून अंबुदाचे परमौदार्य व निःसीमकारुणिकता हीं व्यंजित झालीं. ‘ जीवन ’ यानें श्लेष व्यक्त झाला. ‘ भीति मनांत आणूं नको, ’ इत्यादि वाक्यार्थाला ‘ हा विश्वतापहारक अंबुद आहे ’ इत्यादि वाक्यार्थ हेतुभूत झाला; यास्तव काव्यलिंग अलंकार झाला. भयानक आणि शान्त रस. वसन्ततिलक वृत्त. यमक व छेकानुप्रास हे शब्दालंकार.

३६ ‘ श्रीखण्डा ’ या पदानें चंदनाचे स्वभावसुंदरत्व ध्वनित झालें. ‘ सुंदर ’ शब्दानें गुणराशीचें संरक्षणीयत्व सूचित झालें. ‘ नाशी ’ याच्या ठिकाणीं ‘ भक्षी ’ असा पाठ कल्पिल्यास मूळांतील अर्थाशीं अधिक जुळेल. ‘ द्विजिव्ह ’ शब्दानें श्लेषालंकार झाला. एका मोठ्या दोषानें सर्व गुणांची माती होते हें व्यंग्य. छेकानुप्रास आणि यमक. करुण रस. शार्दूलविक्रीडित वृत्त.

३७. पहिल्या तिन्ही चरणांनीं घनाचे निरपेक्ष लोकतापनिवारकत्व स्पष्ट झालें. ‘ उन्नत ’ या हेतुगर्भ विशेषणानें परिकरालंकार झाला. वृत्त दिंडी.

३८. ‘ वसति ’ याच्याबद्दल ‘ [illegible] ’ हें पद घातलें तर

मूळाशीं अधिक जुळतें. पहिल्या दोन चरणांनीं पद्माचें अनेक

प्रकारानीं उत्तमत्व प्रतीत झालें. 'द्विजोत्तंस हंस' यांनीं श्लेष व्यक्त झाला. परिकरालंकार. छेकानुप्रास. शिखरिणी वृत्त. शांत रस.

३९. ग्रावांबरोबर सन्मणींचा आणि मीनादिकांबरोबर भगवान् विष्णूचा चमत्कारिक सहभाव येथें कल्पिला आहे ह्मणून सहोक्त्यलंकार. 'सूर्यबिंबरुचिर' आणि ' भगवान् ' या हेतुगर्भ विशेषणपदांनीं परिकरालंकार. निन्दा आणि स्तवन यांपैकीं काय करूं हा संशय, ह्मणून संदेहालंकार. छेकानुप्रास. शार्दूलविक्रीडित वृत्त.

४०. ' जलदतुल्य ' या उपमेमध्यें महत्त्व आणि नीलत्व हा सामान्यधर्म समजावा. ' जलद ' या हेतुगर्भ विशेष्यपदानें परिकरांकुरालंकार. ' जलहि ' यांतील ' हि ' या शब्दानें जलाचें तुच्छत्व आणि ह्मणूनच प्रथमदानयोग्यत्व सूचित झालें. छेकावृत्यनुप्रास. गीतिच्छंद.

४१. विपुलजललक्ष्मीरूप कारण असून तृषितदयारूप कार्य घडत नाहीं ह्मणून विशेषोक्ति अलंकार झाला. ' कृशाङ्ग ' या हेतुगर्भ विशेषणपदानें परिकर अलंकार. साधनसंपत्ति असतां दान करणें योग्य. ती नाहींशी झाल्यावर दान करण्याचें सामर्थ्य राहात नाहीं, हें व्यंग्य. वृत्त शिखरिणी. छेकानुप्रास.

४२. ' वदतों ' याबद्दल ' सांगें ' असा पाठ वाचावा ह्मणजे छन्दोभंगपरिहार होईल. ' याचक ' व ' उदारा ' या विशेषणपदसामर्थ्यानें परिकरालंकार. 'त्यांहि न सोडिशी ' यानें सिंधूची अनुचितकार्यप्रवृत्ति दर्शविली. छेकानुप्रास. मालभारिणी वृत्त.

४३. ' भागीरथी ' पदानें गंगेचें जगत्पावनत्व प्रतीत झालें. ' वर्षानदि ' यांतील वर्षा शब्दानें नदीचें नूतन व भंगुर ऐश्वर्य

ध्वनित झालें. दैवयोगानें कांहीं वेळपर्यंत थोडेसें ऐश्वर्य प्राप्त झालें तर थोराशीं स्पर्धा करणें योग्य नव्हे, हें व्यंग्य. 'तिच्या' येथें छंदाकरतां 'तीच्या' असें वाचावें. इंद्रवज्रा वृत्त.

४४. पहिल्या दोन चरणांनीं मधुव्रताचा उत्कर्ष द्योतित झाला. पूज्यत्व हें कारण असूनही आदर हें कार्य झालें नाहीं; ह्मणून विशेषोक्ति. शार्दूलविक्रीडित वृत्त.

४५. छेकानुप्रास, वसंततिलक वृत्त.

४६. पहिल्या चरणानें रसालाची पूर्वींची संपन्न स्थिति व्यक्त झाली. 'तुजपरी तूं धन्य' यानें अनन्वय व व्याजोक्ति हे अलंकार व्यक्त झाले. 'षट्पदा' या पदानें भ्रमराचें 'अधमत्व' ध्वनित झालें. ज्यानें संपन्नदशेंत आपणास साहाय्य केलें तो दुर्दैवानें विपन्न झाला तर त्यास आपण सोडूं नये हें व्यंग्य. छेकानुप्रास. शार्दूलविक्रीडित वृत्त.

४७. 'करिमौक्तिकांचा वर्षाव' या पदांनीं मृगराजाचा शौर्यातिरेक व्यंजित झाला. 'मृगराज' पदानें मृगचक्रवर्तित्व सुचविलें. परिकरांकुर अलंकार. वीर रस. छेकानुप्रास; यमक. वसंततिलक वृत्त. येथें राहिल्यास घात होईल हें व्यंग्य.

४८. 'करिरिपुनें' या साभिप्राय विशेष्यपदसामर्थ्यानें परिकरांकुर अलंकार झाला. छेकानुप्रास. गीतिच्छंद. समर्थानें विपत्कालींही दुर्बलावर शस्त्र धरूं नये, हें व्यंग्य.

४९. पहिल्या दोन चरणांनीं हरीचा पराक्रमातिशय स्फुटित झाला. 'झापडें' याच्या ठिकाणीं 'साकडें' असा पाठ कल्पिला ह्मणजे रसहानि होत नाहीं. रथोद्धता छंद.

५० ' गजेन्द्रा ' या पदानें साधारण गजाविषयीं तर बोलायलाच नको, असा भाव सूचित झाला. ' निबिड वन ' या पदांवरून संकटसंभव ध्वनित झाला. ' मदान्धा ' पदानें गजेन्द्राचा अविवेक प्रस्फुटित झाला. ' करी मानोनीयां ' यावरून करिविषयक भ्रांति व्यक्त झाल्यामुळें भ्रान्तिमदलंकार झाला. ' शिलासंघा प्रखरनखरीं खंडित करी ' यानें मृगपतीचा शौर्यातिरेक द्योतित झाला. ' निजे ' या पदानें मृगपति उठण्याचा मात्र अवकाश आहे; उठला ह्मणजे तूं मेलासच समज, असें व्यंग्य प्रतीत झालें. पहिल्या अर्धांतील वाक्यार्थाला दुसऱ्या अर्धांतील वाक्यार्थ हेतुभूत झाला ह्मणून काव्यलिंग. छेकानुप्रास आणि यमक. शिखरिणी वृत्त.

५१. ' गजराजबाळ ' ' हरिचा बाल ' 'करिणी ' या साभिप्राय विशेष्यपदसामर्थ्यानें परिकरांकुर अलंकार झाला. वरच्या श्लोकांतल्याप्रमाणें काव्यलिंग. 'स्तनपायि' या हेतुगर्भ विशेषणामुळें परिकर अलंकार. ' करिणीच राहतिल ' यांत स्त्रीमारण हें निषिद्ध आहे ह्मणून त्या मात्र राहतील, असा भाव. पुरुष सगळे ठार होतील, हें व्यंग्य. वृत्त्यनुप्रास. मंजुभाषिणी वृत्त.

५२. ' चतुर ' या पदानें माळ्याचें झाडें सरासरी लावण्यापुरतेंच चातुर्य समजावयाचें. अधिक अर्थ घेतल्यास रसव्याघात होईल. 'कोठें तरि ' यावरून बकुलाची किंमत माळ्याला समजली नाहीं, हा अर्थ व्यंजित झाला. ' असें कोणा ठावें ' इत्यादिकानें असंभवनामा अलंकार झाला. ' कोणान्तरिं ' या पदानें प्रतिष्ठासामग्रीचा अभाव सूचित झाला. शेवटच्या चरणावरून बकुलाचा लोकोत्तर गुण प्रकट झाला. अद्भुत रस. छेकानुप्रास. शिखरिणी वृत्त.

५३ पहिल्या दोन चरणांनीं राघवाचा वीर्यशालीपणा स्पष्ट झाला. 'कोठें हा विहरेल' यावरून राघवाची विपन्नदशा ध्वनित झाली. केलिकलहरूप कारण आणि अर्णवत्यागरूप कार्य हीं एकसमयावच्छेदानें घडून आलीं, ह्मणून अक्रमातिशयोक्ति अलंकार झाला. अद्भुतरस. छेकानुप्रास. यमक. शार्दूलविक्रीडित वृत्त.

५४. 'जाळिलें' याबद्दल 'शोपिलें' असें पद केलें तर अर्थाला अधिक अनुगुण होईल. 'जाळिलें' हें पद कायम ठेविलें तर लक्षणेनें शोषून टाकलें किंवा नीरस करून टाकलें, असा त्याचा अर्थ घेतला पाहिजे. तिसऱ्या चरणानें परिमलाचें अलौकिकत्व सूचित झालें. 'ललिता' या पदानें लवंगलतिकेचें रक्षणार्हत्व ध्वनित झालें. 'लतिका' पदानें मार्दवाधिक्य व्यंजित झालें. लवंगलतिका आणि दावानल यांतील वैपम्यामुळें विपमालंकार. छेकानुप्रास. यमक. करुणरस. शार्दूलविक्रीडित वृत्त. परकीय पतिव्रता स्त्रीशीं धृष्टपणा करणें अत्यंत अनुचित होय, हें व्यंग्य.

५५. 'स्वर्गालंकृति' 'अमरद्रूंचें विहारस्थल' 'पुण्यावलींचें फल' यांचा नंदनवनावर आरोप केल्यामुळें रूपकालंकार. खाण्डव हें कुरुक्षेत्रामधील एक इन्द्राचें आवडतें अरण्य होतें. अग्नीनें कृष्ण व अर्जुन यांच्या साहाय्यानें तें जाळून टाकिलें, अशी पौराणिक कथा आहे. 'खाण्डवरंगभूमिनट' ह्मणजे अर्थात् अग्नि. 'नट' शब्दानें खाण्डवाला लीलेनें जाळण्याचें अग्नीचें सामर्थ्य सूचित झालें. 'खाण्डवरङ्गभूमि' येथें रूपकालंकार. भयानक व रौद्र रस. शार्दूलविक्रीडित वृत्त.

५६. पहिल्या दोन चरणांतील कमला देवू मांडे, असें ह्मटलें त्यामुळें रूपकालंकार. 'हस्तिशुंडेपरी' इत्यादिकानें पूर्णोपमा.

स्वैरविहारादि इष्टार्थव्यापारापासून इष्टप्राप्ति न होतां उलट सर्पागमनरूप अनिष्ट प्राप्त झालें ह्मणून विषमालंकार. शार्दूलविक्रीडित वृत्त.

५७. प्रथमार्धांतील अर्थास द्वितीयार्धांतील अर्थ हेतुभूत असल्यामुळें काव्यलिंग अलंकार. तिसऱ्या व चवथ्या चरणांनीं 'तटिनी' चें दुरवगाह्यत्व सूचित केलें. मोठ्यांनाही जें दुष्कर कार्य तें क्षुद्रांनीं हातीं घेणें अनुचित होय हें व्यंग्य. 'ऐसें जनीं बोलती' हें पादपूरणार्थ आहे. 'उपलसा' यावरून उपमालंकार. शार्दूलविक्रीडित वृत्त.

५८. 'नव्हे हा उन्मत्त द्विप' यावरून कोपाचें कारण द्विपभ्रान्ति हें सूचित झालें व त्यामुळें भ्रान्तिमदलंकार व्यंजित झाला. 'प्रचलहरिबाळा' या पदानें उन्मत्त द्विपहननसामर्थ्य ध्वनित झालें. वीर रस. वरील श्लोकांतल्याप्रमाणें काव्यलिंग. शिखरिणी वृत्त.

५९. काव्यलिंग. एक मासाच्या गर्भाच्या ठायीं स्फुरणाचा संबंध नसतां तेथें तो कल्पिला ह्मणून अतिशयोक्ति. 'मत्तकरिभ्रान्तीनें' या पदानें भ्रान्तिमदलंकार. छेकानुप्रास व यमक. गीति छंद.

६०. पूर्वार्धानें हरिपराक्रम सूचित झाला. बलिष्ठानें दुर्बलापुढें आपलें शौर्य मिरविणें अनुचित हें व्यंग्य. छेकानुप्रास. यमक. गीतिच्छंद.

६१. अम्भोरुहावर काम व कविवाणी यांच्या सर्वस्वाचा आरोप झाल्यामुळें रूपकालंकार. अंभोरुहाचें दर्शन प्रेमोत्पादक असल्यामुळें व तें स्वच्छ ... प्रतिष्ठित झाल्यामुळें तें

काम व कविवाणी यांचें सर्वस्व असें ह्मटलें आहे. 'मधुप' शब्दानें श्लेषालंकार होऊन अंभोरुहाची निंदा व्यंजित झाली. 'मोठा चमत्कार हा' यानें अंभोरुहाचा उपहास परिस्फुटित झाला. बहुगुणसंपन्नाची व्यसनासक्ति अत्यंत गर्ह्य होय हें व्यंग्य. छेकानुप्रास. शार्दूलविक्रीडित वृत्त.

६२. 'लीलेनें' व 'सुखभरानें' या पदांनीं 'गजवरा'चा अविवेक ध्वनित केला. काव्यलिंग व रूपक हे अलंकार. छेकानुप्रास. गीतिच्छन्द.

६३. थोर लोकांच्या वाणीला विफलता कधीं येत नाहीं असा भाव. पूर्णोपमालंकार. साकी वृत्त.

६४. पात्रापात्रविचाराविणें गुणांची अपूर्णता या अर्थी विनोक्ति व्यंजित झाली; पात्रापात्रविचार असता तर गुणपूर्णता असती याअर्थी संभावना अलंकार. छेकानुप्रास. यमक. शार्दूलविक्रीडित वृत्त.

६५. पापवासनेनें पुण्यक्षेत्रांत व नृपालभवनांत संचार करणारे लोक प्रस्तुतकालांतही आहेत. पंडितांना दिल्लीदरबारांत आणि वाराणसी व मथुरा या क्षेत्रांत त्यांचा अनुभव आला असें या पद्यावरून दिसतें. 'त्वत्तुल्य' इत्यादिकावरून उपमा. 'त्वत्तुल्य खलवृन्द' या अन्य उपमेयाचा लाभ होऊन प्रकृत उपमेय जें व्याध त्याचा अनादर झाला यास्तव प्रतीप अलंकार झाला. छेकानुप्रास. शार्दूलविक्रीडित वृत्त.

६६. 'मृदुवचनीं वश करुनी' यावरून खलांचें स्वकर्मनैपुण्य प्रतीत झालें. 'काश्यपि' पदानें विवेकार्हत्व सूचित झालें. छेकानुप्रास. खलांना आश्रय देणें हें थोरांना योग्य नव्हे हें व्यंग्य. गीतिच्छद.

६७. लोकोपकारमतिला उपमान नसल्यामुळें अनन्वयालंकार. ' कांहीं विलक्षणाचि ' इ. चरणानें भेदकातिशयोक्ति. छेकानुप्रास आणि यमक. वसंततिलक. अद्भुत रस.

६८. यांत पूर्वार्धस्थ उपमेयवाक्यांतील व उत्तरार्धस्थ उपमानवाक्यांतील समानधर्म एक असून तो औदार्यवैभवदर्शन व लोकोत्तरगंधप्रकटन अशा वेगळ्या रीतीनें सांगण्यांत आला ह्मणून प्रतिवस्तूपमालंकार. पूर्वार्धांतील सामान्य अर्थाचें उत्तरार्धांतील विशेष अर्थानें समर्थन झालें ह्मणून अर्थान्तरन्यास. अद्भुत रस. वसंततिलक वृत्त.

६९. वरील श्लोकांतल्याप्रमाणें प्रतिवस्तूपमा आणि अर्थान्तरन्यास. दिंडी.

७०. पूर्वार्धांतील प्रकृत अर्थानें उत्तरार्धांतील अप्रकृत अर्थाचें ग्रहण झालें यास्तव अर्थापत्ति अलंकार. ' श्वा, ' ' चालपक्षी, ' आणि ' शश ' हीं पदें क्रमानें ' हरि, ' ' नाग ' आणि ' वारण ' यांच्याशीं अन्वित होतात ह्मणून यथासंख्य अलंकार. छेकानुप्रास. शार्दूलविक्रीडित वृत्त.

७१. यांत वैधर्म्यानें प्रतिवस्तूपमा अलंकार झाला. पहिल्या अर्धांतील सामान्य अर्थाचें दुसऱ्या अर्धांतील विशेष अर्थानें समर्थन झालें ह्मणून अर्थान्तरन्यास. छेकानुप्रास. प्रहर्षिणी वृत्त. कष्ट सोसल्याशिवाय मोठेपणा येत नाहीं हें व्यंग्य.

७२. यांत सेवन, धारण, वरण आणि पालन या भिन्नवाक्यगत धर्मांची वस्तुतः एकरूपता असल्यामुळें मालाप्रतिवस्तूपमा अलंकार झाला. येथें शेवटच्या वाक्यांत प्रस्तुत पदार्थाचें उपादान आहे व बाकीच्यांत अप्रस्तुताचें आहे असें धालें पाहिजे. सगळेच

पदार्थ प्रस्तुत किंवा अप्रस्तुत अशी कल्पना केली तर आवृत्ति-दीपक अलंकार होईल. जगांत कोणी निर्दोष नाहीं हें व्यंग्य. छेकानुप्रास, यमक. औपच्छंदासिक वृत्त.

७३. प्रथमार्धगत उपमेयवाक्यांतील व द्वितीयार्धगत उपमानवाक्यांतील समानधर्म जे उपकृति व प्रफुल्लीकरण त्यांचें येथें बिंबप्रतिबिंबरूपानें कथन झाल्यामुळें दृष्टान्तालंकार. वृत्त्यनुप्रास. वसंततिलक.

७४. या पद्यांत विभूतींचें माहात्म्य हा प्रस्तुत लौकिक अर्थ प्रतिपादित झाला. त्याच्या बरोबरच परमार्थव्यासंग, जहत्स्वार्थ, आणि अभेदैकत्व या अप्रस्तुत शास्त्रीय अर्थांचा साधारण विशेषणसामर्थ्यानें थोडक्यांत भास झाला यास्तव समासोक्ति. छेकानुप्रास. शिखरिणी वृत्त.

७५. वैधर्म्यप्रतिपादित प्रतिवस्तूपमा आणि श्लेष हे अलंकार. यमक. गीतिच्छंद.

७६. पूर्णोपमा अलंकार. गीतिच्छंद.

७७. प्रथमार्धांतील सामान्य अर्थाचें द्वितीयार्धांतील विशेष अर्थानें समर्थन झालें ह्मणून अर्थान्तरन्यास. रुग्णावस्थेचा अथवा संसारसागराचा पार देणारा ह्मणजे दाखविणारा ह्मणून पारद-श्लेषालंकार. गीतिच्छंद.

७८. 'शशशिशु बघोनी डचकली' यानें सीतेचें परमभीरुत्व व्यंजित झालें. 'दशवदन' या हेतुगर्भ विशेष्यपदानें परिकरांकुर. 'दशवदन' यानें रावणाचें विकराल स्वरूप प्रतीत झालें. अत्यंत भीरु, कोमलांगी, राजकुमारी, पति-व्रता, अशी जानकी, राक्षसपति, दशतुंड, क्रूरकर्मा अशा रावणाच्या

हातांत सांपडावी हा अननुरूप संसर्ग झाल्यामुळें विषमालंकार. भयानक आणि करुण रस. थोरांनाही प्राक्तनकर्मभोग चुकत नाहीं असा भाव. यमक; छेकानुप्रास. शिखरिणी वृत्त.

७९. ' त्रिपुरमथनीं ' यानें शिवाचें विक्रमशालित्व सूचित झालें. हें विशेष्यपद हेतुगर्भ असल्यामुळें परिकरांकुर अलंकार. कोणीकडे ' त्रिपुरमथन ' आणि कोणीकडे ' सुरवधूवंद्य काम ' असें वैषम्य ध्वनित झाल्यामुळें विषमालंकार. ' सुरवधूवंद्य आणि ' सरसा ' यांनीं कामाचें कोमल आणि मधुर सौंदर्य प्रतीत होऊन अपौरुषही भासमान झालें. प्रस्तुत हेतुगर्भ विशेषणसामर्थ्यानें परिकरालंकार. समर्थ आणि पूज्य अशा पुरुषाशीं दुर्बल आणि क्षुद्र माणसानें स्पर्धा करूं नये, केल्यास त्याचाच नाश होईल हें व्यंग्य. शिखरिणी वृत्त.

८०. मर्कटांच्या क्रियांचें वर्णन झालें ह्मणून स्वभावोक्ति. उपजाति वृत्त. अथवा ' सभेंत ' याबद्दल ' गोष्टींत ' असा पाठ कल्पून इंद्रवज्रा वृत्त समजावें.

८१. गीतिच्छंद. छेकानुप्रास. नारायणपादपद्मभजनादिक हेंच तीर्थादिक आहे, अन्य नाहीं असा अर्थ तात्पर्यरूपानें गम्यमान होतो ह्मणून आर्थी प्रश्नपरिपूर्विका परिसंख्या हा अलंकार झाला.

८२. उपमालंकार. छेकानुप्रास. दिंडी.

८३. गुणपूर्णतेचें दोषरूपानें वर्णन झाल्यामुळें, आणि गुण-हीनतेचें गुणरूपानें वर्णन झाल्यामुळें लेशालंकार. प्रथमार्धांतील अर्थाचें द्वितीयार्धांतील हेतुभूत अर्थानें समर्थन झालें यास्तव काव्यलिंग. ' इतर ' शब्दानें क्षुद्रता व्यक्त झाली. ' मलयजा ' पदानें निसर्गोदात्तता सूचित झाली. छेकानुप्रास. द्रुतविलंबित वृत्त.

८४. 'परयाचनचिंताग्नि' यानें रूपकालंकार. याचनेचा प्रसंग न येणें हीच परमभाग्याची सीमा हें व्यंग्य. छेकानुप्रास. गीतिच्छंद.

८५. श्लेषमूलक पूर्णोपमालंकार. यमक, छेकानुप्रास. गीतिच्छंद.

८६. यांत 'रक्षण' आणि 'शमन' हे शब्द विरोधिलक्षणेनें विपरीतार्थबोधक आहेत. रूपकालंकार. नीचवर्णन अशक्य हें व्यंग्य. छेकानुप्रास. गीतिच्छंद. 'एकटा' यानें अनलाचा अनन्यसाधारण उत्कर्ष ध्वनित झाला.

८७. श्लेषमूलक पूर्णोपमा. छेकानप्रास. गीतिच्छंद.

८८. रूपकालंकार. लशुन जसा सुगंधाची हानि करणारा तसा खलही सत्कीर्तीची हानि करणारा आहे; जसा अनलाचे ठिकाणीं हिमाचा अभाव तसाच शांतीचाही खलाच्या ठिकाणीं अभाव; पुष्पाचा जसा आकाशांत सर्वथा असंभव तसाच दयेचाही खलाच्या ठिकाणीं सर्वथा असंभव. गीतिच्छंद.

८९. तिसऱ्या चरणानें उपकाराची परमावधि सुचविली. 'उदारतिलका' या हेतुगर्भ विशेषणानें परिकर अलंकार. वसंततिलक वृत्त.

९० 'दुर्जनासि वश कराया इच्छितसें' या उपमेयवाक्यार्थाचें आणि पहिल्या तीन चरणांतील तीन उपमानवाक्यार्थांचें ऐक्य 'जो' व अध्याहृत 'तो' यांनीं आरोपित केलें आहे ह्मणून निदर्शनालंकार. दुर्जनवशीकरणाचा प्रयत्न हानिकारक आहे हें व्यंग्य. छेकानुप्रास, यमक. वसंततिलक वृत्त.

९१. पुरुष उच्चपदाला पोहोंचला ह्मणजे सारासारविचारशून्य होतो हें व्यंग्य. छेकानुप्रास. प्रहर्षिणी वृत्त.

९२. यांत वस्तूंचा उत्तरोत्तर उत्कर्ष वर्णित झाला, यास्तव साराळंकार. गीतिच्छंद.

९३. यांत शेवटल्या उपमेयवाक्यार्थाचें पूर्वींच्या तीन उपमानवाक्यार्थांशीं 'जो' आणि अध्याहृत 'तो' या पदांनीं ऐक्य आरोपित केलें ह्मणून निदर्शनालंकार. गीतिच्छंद.

९४. यांत वानराच्या स्वाभाविक चेष्टांचें वर्णन झालें ह्मणून स्वभावोक्ति. अनभिज्ञाला सुंदर वस्तु दिली तर तिचा नाश होतो हें व्यंग्य. साकी वृत्त.

९५. सौंदर्यादि विलोभन नसतां प्रेम; आणि प्रेमाचा अभाव नसतां त्याग असा कारणाभाव असून कार्योत्पत्ति झाल्यामुळें विभावनालंकार. हा श्लेषमूलक आहे हें उघड आहे. गीतिच्छंद.

९६. 'स्वोदरार्थ;' आणि 'परार्थ'; तसेंच 'मुखास' आणि 'समग्र तनु' यांतील विरोधानें श्लोकार्थाला सौंदर्य आलें आहे. पहिल्या अडीच चरणांतील अर्थाचें पुढल्या दीड चरणांतील अर्थानें समर्थन झालें ह्मणून काव्यलिंग. छेकानुप्रास. वसंततिलक वृत्त.

९७. कुलानें, संगतीनें किंवा जातीनें महत्व येत नाहीं. तें येण्याला स्वताच्या अंगीं तसे गुणच पाहिजेत हें व्यंग्य. छेकानुप्रास. गीति.

९८. अत्यंत सुंदर पदार्थांवर कली एकसारखा पोसतो आहे या वस्तूनें तुला जर मरायचें असेल तर तूं स्वात्मालंकरणादि गुणप्राप्तीच्या नादीं लाग ही वस्तु व्यंजित झाली. छेकानुप्रास. शार्दूलविक्रीडित वृत्त.


९९. कमलांच्या प्रफुल्लतेचा अभाव नसून दिसांनीं सारत्व

वर्णिलें इत्यादिकानें विभावनालंकार. 'अंगारापरि' यानें उपमालंकारही. यमक. छेकानुप्रास. साकी.

१००. 'वाटोनी' पदानें गजराजविषयक भ्रान्ति स्फुट झाली ह्मणून भ्रान्तिमदलंकार. वीर्यशालित्व हें कारण असूनही कवलरूप कार्याचा अभाव वर्णिला ह्मणून विशेषोक्ति. यमक. छेकानुप्रास. प्रहर्षिणी वृत्त.

१०१. यांत गर्जितानें करिशब्दभ्रान्ति ध्वनित झाली यास्तव भ्रान्तिमान् अलंकार व्यंजित झाला. 'रात्र्यर्धजात' पदानें हरिशिशूचा नैसर्गिक प्रतापातिशय सुचविला. उड्डानार्थ स्वांगाकर्षण ही हरिशिशूची स्वाभाविकक्रिया वर्णित झाली; म्हणून स्वभावोक्ति. छेकानुप्रास. गीतिच्छंद.

( शृंगारविलास. )

१. राहुरोपशंका, कलंक आणि पाण्डुरता यांच्या अभावानें वदनाचें चंद्रापेक्षां आधिक्य ध्वनित झालें; यास्तव व्यतिरेकध्वनि. राहुरोपशंकादिकांचा अभाव वदनद्युतिप्रकाशनरूप कार्याला हेतुभूत आहे ह्मणून काव्यलिंग. 'सतत प्रकाशे' या पदांनीं वदनद्युतीचा उत्कर्ष स्पष्ट झाला. 'तीस साम्य न भासे' एणेंकरून अनन्वयालंकार झाला. राहु चंद्राला ग्रासतो हें प्रसिद्ध आहे. भामिनीनामक पंडितरायांची स्त्री. चिंता कांतिक्षयकारिणी आहे आणि चिंताभाव कांतिवर्धनकर आहे हें व्यंग्य. छेकानुप्रास. पुष्पिताग्रा वृत्त. शृंगार रस.

२. 'अब्जमाला,' 'बिसतति' आणि 'पल्लव' यांच्यापेक्षां अंगकांति जाईच अधिक आहे असें वर्णिलें ह्मणून व्यतिरेक. छेकानुप्रास. पुष्पिताग्रा वृत्त.

३. छेकानुप्रास. विप्रलंभ शृंगार. वसंततिलक वृत्त.

४. यांत नायिकेच्या मुखाचें प्रसन्नचंद्राशीं अभेदरूपानें वर्णन ध्वनित झालें ह्मणून रूपकध्वनि. वसंततिलक.

५. नायिकेचे स्वाभाविक विलास वर्णन केले यास्तव स्वभावोक्ति. विप्रलंभशृंगार. छेकानुप्रास. साकी.

६. छेकानुप्रास. साकी. पतिप्रेम हें व्यंग्य.

७. नायकाकडे पाहण्याविषयीं उत्सुकता व त्याकडे पहात असतां वडील माणसें पाहतील कीं काय ही भीति; ह्मणून ईषत्फुल्लाब्जसाम्य कल्पिलें. उपमा. दिंडी.

८. श्लेषमूलक उत्प्रेक्षा. छेकानुप्रास. साकी.

९. विजेच्या क्षणिक तेजावरून नायिकेचें पलायन सूचित झालें. नायकविषयक लज्जा हें व्यंग्य. छेकानुप्रास. उपजाति वृत्त.

१०. लटिका कोप दावणें हें कारण आणि लोचनांला कंप येऊन तीं अश्रुपरिप्लुत होणें हें कार्य एकसमयावच्छेदानें कल्पिलें ह्मणून अतिशयोक्ति. पहिल्या चरणानें प्रणयप्रकुपित नायकाची स्वाभाविक कृति वर्णिली यास्तव स्वभावोक्ति. ' अन्यधामीं ' यांत कोपातिशय व्यंजित झाला. ' मी जाऊं नये ह्मणून किती प्रकारांनीं तरी नायिकेनें माझी प्रार्थना केली ! ' असा शेवटल्या चरणाचा भाव. छेकानुप्रास आणि वृत्त्यनुप्रास. वसंततिलक.

११. वृत्त्यनुप्रास. साकी. तरुणीकटाक्ष अत्यंत मनःक्षोभ करणारा आहे हें व्यंग्य.

१२. उपमा. भ्रमातिरेक व्यंग्य. छेकानुप्रास. रथोद्धता वृत्त.

१३. पहिल्या दोन चरणांनीं नायकविषयक औत्सुक्य प्रतीत झालें. विकास शब्दानें हर्ष स्फुटित झाला. मालभारिणी वृत्त.

१४. पुष्पिताग्रा वृत्त. रत्यभिलाष हें व्यंग्य.

१५. अपराधरूप कारणाचा अभाव असतां नेत्र रक्त होणें हें कार्य झालें यास्तव विभावना. प्रणामरूप कारण असून हर्षरूप कार्याची उत्पत्ति नाहीं ह्मणून विशेषोक्ति. प्रयाणाचा व जीवितहानीचा संबंध नसतांही तो वर्णिला ह्मणून अतिशयोक्ति. औपच्छंदसिक वृत्त.

१६. साकी. विप्रलंभशृंगार. छेकानुप्रास.

१७. सरोजधर्म तरुणीमुखांत असल्यामुळें तरुणीमुखासंबंधानें अलिकिशोरकसंघाला सरोजभ्रान्ति झाली ह्मणून भ्रान्तिमान् अलंकार. दोन समानधर्मि वस्तु पुढें आहेत. एक तीरावर व दुसरी नीरामध्यें. तेव्हां तीरस्थित वस्तु कमल होय किंवा नीरस्थित वस्तु कमल होय असा संशय अलिकिशोरकसंघाला उत्पन्न झाला ह्मणून ससंदेह अलंकार. 'किशोरक' या शब्दानें अलींची अपरिपक्क बुद्धि व्यक्त झाली. छेकानुप्रास. वसंततिलक वृत्त.

१८. सवतमत्सर हें व्यंग्य. छेकानुप्रास. साकी.

१९. विरहाचा असह्यपणा हें व्यंग्य. छेकानुप्रास. औपच्छंदसिक वृत्त.

२०. तिसऱ्या चरणांत मुग्धांगनेचा स्वाभाविक विलास वर्णिला ह्मणून स्वभावोक्ति. छेकानुप्रास. दिंडी. विप्रलंभशृंगार.

२१. मलयभुजंगापासून वाहणें आणि मधुकराचें मंजुल गाणें हीं दोन्हीं कारणें विरहिणीजीवितनाशाविषयीं एकाच कालीं

अविरोधानें ग्रथित केलीं ह्मणून समुच्चयालंकार. प्रथमचरणांतील अर्थाला अन्यचरणांतील अर्थ हेतुभूत असल्यामुळें काव्यलिंग. ' भुजग ' शब्दानें वायूंचें प्राणहारकत्व व्यंजित झालें. छेकानुप्रास. मालिनी वृत्त.

२२. दुसऱ्या दोन चरणांमध्यें नायिकेचा लज्जारूपव्यभिचारिभाव द्योतित झाला. उपजाति वृत्त. छेकानुप्रास.

२३. दिक्तमोहरणक्रियेनें आणि तप्तजनशमनानें चंद्रापेक्षां वदनाचें आधिक्य प्रतीत झालें यास्तव व्यतिरेकध्वनि. शेवटच्या चरणानें कमल या उपमानाचा अधिक्षेप वर्णिला ह्मणून प्रतीपालंकार. द्रुतविलंबित वृत्त. छेकानुप्रास.

२४. कोमलत्वानें ' गंड लवलीवल्लीला लाज आणतो यानें वरच्याप्रमाणें प्रतीपालंकार. शेवटच्या दोन चरणांनीं कोमलत्व, शुभ्रत्व, प्रफुल्लितत्व इत्यादि गंडगतगुणांचा उत्कर्ष वर्णित झाला. छेकानुप्रास. दिंडी.

२५. मोह आणि लज्जा यांनीं अनुक्रमें नयनाब्जश्रींचा उल्लास व संकोच झाला यास्तव यथासंख्य अलंकार. भगवान् दाशरथी रामचंद्र याच्या लोकोत्तरयौवनोद्गमाचें; आणि शील, शौर्य, बल आणि कांति यांचें दर्शन हा विभाव; नयनगत संकोचविकास हा अनुभाव; लज्जा आणि उत्सुकता यांचा संधि व्यंग्य आहे. छेकानुप्रास. साकी वृत्त. रूपकालंकारही.

२६. ' ईशचाप ' आणि ' मिथिलानायकनंदिनी ' या हेतुगर्भविशेष्यपदसामर्थ्यानें परिकरांकुर. सुखानें ह्मणजे निर्विघ्नपणें. मिथिलेंतील जनांची सीतारामचंद्रसंयोगविषयक चिंता व्यंग्य आहे. छेकानुप्रास. औपच्छंदसिक वृत्त.

२७. उपनिषदर्थपरिग्रह आणि गीतावगाहन हीं उपरतिकारणें विद्यमान असतां उपरतिरूपकार्य होत नाहीं असें वर्णिलें ह्मणून विशेषोक्ति. छेकानुप्रास, यमक. गीति. मनोविषाद व्यंग्य.

२८. ताक विकून कवड्या गोळा करावयाच्या हा जो वांछितार्थ त्याच्या प्राप्तीकरितां खटपट चालली असतां महेन्द्रनीलमण्याचा फार मोठा लाभ झाला असें वर्णन आहे ह्मणून प्रहर्षणालंकार. महेंद्रनीलमणि यानें श्रीकृष्ण द्योतित होतो. गीति. छेकानुप्रास.

२९. रूपाविषयीं अरुचि नाहींशी करण्याविषयीं उपाय योजला पण त्यानें उलट सगळ्या जगताविषयीं अरुचि उत्पन्न झाली ह्मणून विषमालंकार. छेकानुप्रास. यमक. गीति.

३०. वदन या उपमेयाचे संबंधानें सुवर्ण या उपमानाचा अधिक्षेप वर्णिला ह्मणून प्रतीपालंकार. छेकानुप्रास. वसंततिलक.

३१. ' वचनें, ' ' गति, ' आणि ' विलास ' या प्रस्तुत क्रियांचा माधुर्यरूप एकधर्माशीं अन्वय झाला यास्तव तुल्ययोगिता. छेकानुप्रास. दिंडी.

३२. ' उपमा नाहीं ' यावरून अनन्वय अलंकार. दुसऱ्या अर्धांत हेतूत्प्रेक्षा. साकी.

३३. ' नयनाब्ज ' यावरून रूपकालंकार. विकसित शब्दानें नयनाब्जांचें लोभनीयत्व व्यंजित झालें. प्रकृतकस्तूरीतिलकाचा अपलाप करून अप्रकृत अशा अलीचा त्यावर आरोप केला ह्मणून अपन्हुति अलंकार. गीति. छेकानुप्रास.

३४. ' सांगतों ' याच्या ठिकाणीं ' सांगतें ' असें समजावें. कारण ही सखीची नायिकेप्रत उक्ति आहे. ' तूं रुसली आहेस

ह्मणून तुझ्या मुखावर प्रसन्नता नाहीं. यास्तव पूर्णचंद्र तुला जिंकील ' असा भाव. एरव्हीं तुझ्या मुखाचा नेहमीं उत्कर्षच आहे हें व्यंग्य. ' अनंग, ' ' आली ' व ' जीवितेश ' यांचा मनोभंग करून आपल्यालाही हास्यास्पद करून घेणें यांत कांहीं शाहाणपण नाहीं हें व्यंग्य. यमक, छेकानुप्रास. शार्दूलविक्रीडित.

३५. कर्णभूषणाच्या प्रस्तुत वृत्तांतावरून श्रुतिशृंगार, सीत्कार, कांताकरस्पर्श, इत्यादि पदांच्या अर्थसामर्थ्यानें अप्रस्तुत नायकवृत्तांताचेंही स्फुरण होतें ह्मणून समासोक्ति. यमक. छेकानुप्रास. शिखरिणी वृत्त.

३६. निशेचें आगमन आणि चंद्राचा उदय हीं मानत्यागाचीं कारणें पूर्णपणें विद्यमान असतां मानत्याग हें कार्य घडलें नाहीं असें झटलें ह्मणून विशेषोक्ति. प्रखररोषानल आणि कोंवळ्या कमलनालापेक्षां कोमल तनु यांचा विषम संयोग झाला यामुळें विषमालंकार. ' लाजवि ' या पदानें कोमलत्वासंबंधानें बालमृणाल या उपमानाची तुच्छता दर्शविली ह्मणून प्रतीपालंकार. यमक, छेकानुप्रास. शार्दूलविक्रीडित. मान सोड; नाहीं तर प्राणान्त होण्याचा प्रसंग येईल हें व्यंग्य.

३७. ' हस्तकमलीं ठेऊनियां आनन ' याच्या ठिकाणीं ' कोमलकरीं आस्यांबुजा ठेउन, ' असा पाठ वाचावा. कोमलकराचे ठायीं आस्यांबुज ठेवणें, श्वास टाकणें, अत्युष्ण अश्रु ढाळणें, उत्कंठेनें प्राणेश्वराकडे डोळे लावणें या विरहिणीच्या स्वाभाविक क्रिया वर्णिल्या ह्मणून स्वभावोक्ति. नायक आलंबनविभाव, श्वास व अश्रुपात हे अनुभाव, विषाद चिंतादिक व्यभिचारिभाव यांच्या संयोगानें वियोगकालची रति अभिव्यंजित झाली ह्मणून विप्रलंभ शृंगार. लुप्तोपमा. छेकानुप्रास. शार्दूलविक्रीडित.

३८. 'मुखसरोज' यानें लुप्तोपमा. 'दैन्यलीला वरितील' यावरून प्रतीपव्यंजना. 'दिग्मंडलें हर्षतील' यानें अतिशयोक्ति. यमक. छेकानुप्रास. वसंततिलक.

३९. विषारी वायु वाहणें, आम्रद्रुमानें नयनसंताप होणें, कोकिलांनीं कूजितमिषानें हालाहल विखरणें या पदार्थांचा एकसमयावच्छेदानें प्राणहानिरूप सामान्यधर्मांच्या ठिकाणीं अन्वय झाला ह्मणून समुच्चय. छेकानुप्रास. यमक. शार्दूलविक्रीडित.

४०. रात्रिसंनिधानानें मानविनाशसिद्धि व्हावयाची इतक्यांत चंद्रोदयानें अनायासेंच कार्य झालें ह्मणून समाधि अलंकार. 'कामातपत्रापरी' यांतील उपमेनें चंद्रबिंबाचें मानहारकत्व सुचविलें. छेकानुप्रास. शार्दूलविक्रीडित.

४१. नयनद्वंद्वाचा उत्तरोत्तर उत्कर्ष वर्णिला ह्मणून सारालंकार. छेकानुप्रास. वृत्त्यनुप्रास. शिखरिणी.

४२. 'नित्योल्लासित' पदानें वदनाचें क्षयिष्णुचंद्रापेक्षां आधिक्य सूचित झालें ह्मणून व्यतिरेकालंकार. नित्योल्लासितत्वाला हेतु अनुरूपप्राणवल्लभसंयोग होय. 'खंजनाक्षवदना' यानें लुप्तोपमा. छेकानुप्रास. शार्दूलविक्रीडित.

४३. नंदसूनु हा आलम्बनविभाव, उसासे हा अनुभाव, शून्यवृत्ति हा व्यभिचारिभाव, यांच्या संयोगानें विरहकालीन रति द्योतित झाली ह्मणून विप्रलंभ शृंगार. साकी.

४४. भगवद्गुणवर्णनानें अनुरागव्यंजक स्वेदरोमांचादि सात्विकभावाचीं लक्षणें उत्पन्न झाल्यावरोबर तीं लक्षणें अनुरागामुळें उत्पन्न झालीं नसून आश्चर्यामुळें उत्पन्न झालीं आहेत, असें

दाखविण्याकरितां अद्भुत रसाचा पोष करणारें असें कालियमर्दन-वर्णन कुलवधूनें सुरूं केलें ! अपह्नुति. साकी. छेकानुप्रास.

४५. पूर्णचन्द्र आणि वदन; कमलश्री आणि नयन; अमृत आणि सरसहसित; यांचें अभेदरूपानें वर्णन ध्वनित झालें ह्मणून रूपकालंकारध्वनि. छेकानुप्रास. यमक. साकी.

४६. पल्लव या उपमानपदाचा तिरस्कार पहिल्या चरणांत द्योतित झाला म्हणून प्रतीप. दुसऱ्या चरणांत विधु या उपमानाचा माधुर्यासंबंधानें आननश्री या उपमेयापेक्षां कमीपणा वर्णिला ह्मणून व्यतिरेकालंकार. 'अनुपम' शब्दानें अनन्वयालंकार. शेवटच्या चरणानें भामिनीचा सौंदर्योत्कर्ष व विधीचें भामिनीसारखी स्त्री तयार करण्याचें असामर्थ्य हीं द्योतित झालीं. मालिनी. छेकानुप्रास.

४७. जगद्गुरुपत्नीविषयक रति असल्यामुळें विप्रलंभाभास. मौन धरून बसणें, चावळणें, बावरणें, श्वास घेणें, धैर्य सोडणें, या अनेक क्रियांचा एकसमयावच्छेदानें व्यथाकुलत्व या सामान्यधर्मांत अन्वय झाला ह्मणून समुच्चय. यमक. छेकानुप्रास. शार्दूलविक्रीडित.

४८. शोक आणि हर्ष या क्रिया एकाच वेळीं भिन्नधर्मी पदें जीं 'विरहि लोक' आणि 'अनंग' त्यांशीं अन्वित झाल्या ह्मणून समुच्चय. छेकानुप्रास. दिंडी.

४९. प्रफुल्ल कमलपंक्तीच्या नामनिर्देशानें तत्सदृश रमणीनयनस्मरण या ठिकाणीं व्यंजित झालें. ह्मणून स्मरणालंकारध्वनि. 'हंसति' यानें कमलालींचें सौभाग्य व्यक्त झालें. साकी.



५०. प्रियवचनश्रवण हा विभाव; दयितानयनकोणगत

रागाचा नाश किंवा त्यानें अभिव्यक्त झालेला प्रसाद हा अनुभाव. उत्पत्तिकालींच रोषनाश हें व्यंग्य. घनपंक्तीचा उदय हें कारण असतां कोपत्यागरूप कार्य घडलें नाहीं असें ह्मटलें ह्मणून विशेषोक्ति. यमक. साकी.

५१. मुखरूप एकच वस्तु भृंग आणि चकोर यांस क्रमानें सरोज आणि सुधांशु एतद्रूप वाटली ह्मणून उल्लेखालंकार. छेकानुप्रास. वृत्त्यनुप्रास. वसंततिलक. 'सुधांशु' पदानें परिकरांकुरही.

५२. 'स्मित,' 'मुख,' 'कुचकल्पना,' आणि 'रमणी' या प्रकृतपदार्थांचा निरनिराळ्या प्रकारानें निषेध करून 'नवविकास,' 'सुगंधि सुम,' 'कनकवर्ण सत्फलें,' आणि 'रुचिर वल्लरी,' या अप्रकृत अर्थांची क्रमानें सत्यतापूर्वक सिद्धि केली ह्मणून अपह्नुति. छेकानुप्रास. पृथ्वी.

५३. चंद्रोदयानें संतप्त झालेल्या विरहिनायकाला शशांक हा तत्सदृशतेमुळें नीलरंध्रयुक्त सूर्य आहे अशी भ्रान्ति झाली म्हणून भ्रांतिमदलंकार. संग्रामांत जे योद्धे मरून पडतात ते सूर्यमंडलभेद करून मुक्ति पावतात अशी उक्ति आहे. ( द्वाविमौ पुरुषौ लोके सूर्यमंडलभेदिनौ । परिव्राड् योगयुक्तश्च रणेचाभिमुखो हतः ॥ ) मंडलभेदामुळें सूर्याला सच्छिद्रता आली आणि ती शशांकसादृश्याला उपयोगी पडली. 'वरतीं स्वरूपाप्रती जाती' म्हणजे सूर्यमंडल भेदून मुक्त होतात. छेकानुप्रास. शार्दूलविक्रीडित.

५४. सित आणि कृष्ण या प्रकृत दृष्टिस्वरूपाचा निषेध करून अप्रकृत 'पीयूष' आणि 'विष' यांची अनुक्रमें सत्यतेनें सिद्धि केली म्हणून अपह्नुति. छेकानुप्रास. वसंततिलक.

५५. मुखावर तत्सादृश्यास्तव कमल आणि मृगांक यांचा संशय उत्पन्न झाला म्हणून ससंदेहालंकार. छेकानुप्रास. साकी.

५६. हीं दशनकांति नव्हे, तर केसर होत; हे अलक नव्हत तर अलि होत; या दोन अपह्नुतींनीं तूं नारी नाहींस, तर कमलिनी आहेस ही तिसरी अपह्नुति व्यंजित झाली. यमक. छेकानुप्रास. पुष्पिताग्रा वृत्त.

५७. पंकजा या उपमानापेक्षां आनना या उपमेयाचा उत्कर्ष वार्णला ह्मणून व्यतिरेक. मुखाचें सततोल्लसितत्व व निशेच्या ठायीं पंकजाची सौंदर्यहानि येणेंकरून वरील व्यतिरेक स्पष्ट झाला. पंकजपदानें नैसर्गिक अधमता व्यंजित झाली आणि त्यामुळें परिकरांकुर. दिंडी.

५८. प्रिया सुमकांतिहरण करिते, आणि कुसुमबाण माझे प्राण घेतो, अशी कार्यकारणांची असंगति झाल्यामुळें असंगतिनामा अलंकार. पूर्वार्धांत व्यतिरेकही. साकी. यमक. छेकानुप्रास.

५९. विरहव्यथेमुळें व्रजांगनांना पूर्णिमा प्रळयकाळाच्या अग्निप्रमाणें असह्य वाटली आणि सुंदर सौधप्रदेश समुद्रासारखे अफाट आणि शून्य वाटले असा विरुद्ध प्रकार वर्णिला ह्मणून विरोधालंकार. छेकानुप्रास. साकी.

६०. बाल्यासह गमनाचें मन्दत्व; चित्तासह अधरबिंबाचें सुरक्तत्व; आणि मन्मथाबरोबर नितंबाचें असामान्य गुरुत्व असा चमत्कारिक सहभाव वर्णिला ह्मणून सहोक्ति. वसंततिलक.

६१. प्रथमाधांवरून नायिकेचें मरण आक्षिप्त झालें. दिंडी.

६२. रूपकालंकार. स्वेद आणि कंप हीं सात्विकभावाचीं लक्षणें आहेत. प्रभातनलिन ह्मटलें यावरून नलिनाची कोमलता,

किंचित् विकास आणि किंचित् मुकुलीभाव हीं द्योतित झालीं. यमक. छेकानुप्रास. वसंततिलक.

६३. विद्रुमवल्लरी आणि पल्लव या उपमानपदांचा माधुर्यासंबंधानें तिरस्कार स्पष्ट झाला यास्तव प्रतीप. छेकानुप्रास. द्रुतविलंबित.

६४. खंजननयनलीला आणि सुंदरीनयनलीला या उपात्त अर्थाची उपमेंत पर्यवसित होणारा अभेद दर्शविला ह्मणून निदर्शना. उत्तरार्धांत कमलाच्या अल्पकाळ टिकणाऱ्या लक्ष्मीनें सर्वदा सश्रीक दिसणाऱ्या वदनाचा उत्कर्ष वर्णिला ह्मणून व्यतिरेक. मालिनीवृत्त. यमक. छेकानुप्रास.

६५. रूपक स्पष्ट आहे. सीता आणि रामचंद्र यांनीं परस्परहृदयप्रवेशनरूप व्यापार केला यास्तव अन्योन्यालंकार. छेकानुप्रास. मालभारिणी.

६६. प्रियेच्या सुवर्णांगयष्टिरूप प्रकृतपदार्थाचा अप्रकृतकांचनराजीच्या उपन्यासानें तिरस्कार झाला ह्मणून प्रतीप. मालभारिणी.

६७. दंतांनीं आपली नैसर्गिक धवलता टाकून आपल्याजवळ असणाऱ्या अधरोष्ठात्मक भिन्नवस्तूचा रक्तिमारूप गुण ग्रहण केला ह्मणून तद्गुण अलंकार.

६८. मुखाच्या नैसर्गिक रक्तपणामुळें तांबूलाचा रक्तपणा तेथें ओळखतां येण्याला साधन नाहीं असें वर्णिलें ह्मणून मीलित अलंकार. शिवाय रूपक आणि प्रतीपही. छेकानुप्रास. साकी.

६९. यांत प्रश्नाला प्रतिबंधक असें गूढार्थज्ञापक उत्तर आहे म्हणून उत्तरालंकार. या गीतींत कोणा एका पांथाचा आणि

परकीय स्त्रीचा संवाद आहे. पांथकृत पहिल्या प्रश्नांत कृशत्वाचें कारण सांगशील तर मी तें दूर करीन असा आशय गर्भित आहे. याच्यावरील उत्तरानें असें सुचविलें कीं, मी पतिव्रता आहें; पर-पुरुषाला कृशत्वाचा हेतु सांगणें उचित नव्हे आणि त्यानें त्याचा प्रतिकार करणेंही शक्य नव्हे. द्वितीयार्धगत पांथकृत द्वितीयप्रश्नाचा व्यंग्यार्थ असा कीं पातिव्रत्याच्या कसच्या गोष्टी सांगतेस, चैन करणें हेंच संसारसार आहे. याच्यावरील उत्तरानें असें ध्वनित केलें कीं, जी माझी दशा तीच तुझ्या जायेचीही आहे, तिचा प्रतिकार कर ह्मणजे पुरे; आपल्या घराला आग लागली असतां तें तसेंच सोडून दुसऱ्याच्या घराची आग विझविण्याला धांवणें हा कोण मूर्खपणा! वृत्यनुप्रास.

( करुणविलास. )

१. करुणविलासांतील या आणि इतर सगळ्या पद्यांत विप्र-लंभ शृंगार आहे. अठराव्या पद्याचें वृत्त औपच्छंदसिक आहे. बाकीच्या सर्व पद्यांचें वृत्त वसंततिलक आहे. छेकानुप्रास.

२. नायिका आलंबनविभाव, अश्रुपातादिक अनुभाव, आ-वेग, विषाद वगैरे संचारिभाव यांनीं नायकगतरति व्यंजित झाली. आत्ममूलक शोकाची ती येथें अंगभूत झाली आहे. छेकानुप्रास.

३. पूर्णोपमालंकार. छेकानुप्रास.

४. ' सदये ' या हेतुगर्भ विशेष्यपदसामर्थ्यानें परिकरांकुर. छेकानुप्रास.

५. ' यत्नें ' या पदानें शिलाशकलावर देखील चढण्याचें असामर्थ्य सुचविलें. ' स्वर्ग ' आणि ' असहाय ' या पदांनीं

भामिनीच्या कृत्याचा अत्यद्भुतपणा ध्वनित केला. यमक. छेकानुप्रास.

६. श्लेषमूलक पूर्णोपमा. छेकानुप्रास.

७. भामिनीचा गर्भितव्यतिरेकानें पूर्वकालीन उत्कर्ष स्फुटित झाला. अधिपति अस्तंगत झाला ह्मणजे बाजारबुणग्यांचें साम्राज्य स्थापित होतें हें व्यंग्य. छेकानुप्रास. यमक.

८. लुप्तोपमा आणि पूर्णोपमा.

९. मुक्ति या स्त्रीलिंगिपद्सामर्थ्यानें सखीगृहगमन सूचित झालें. 'पतिव्रता' शब्दानें परिकरांकुर. यमक.

१०. पूर्णोपमा आणि विनोक्त्यलंकार. वृत्यनुप्रास.

११. पहिल्या अर्धांत व्यतिरेक. छेकानुप्रास. सूर्य अस्ताला गेला ह्मणजे काजवे चमकूं लागतात हें व्यंग्य.

१२. रूपकालंकार. प्रस्तुत भामिनीरूप गृहदेवतेबरोबर विशेषणंसामर्थ्यानें अन्य इष्टदेवतेचा वृत्तांत मनांत येतो ह्मणून समासोक्ति. छेकानुप्रास.

१३. उपमालंकार. उत्तरार्धानें भामिनीकृत्यांचें अत्यंत अनौचित्य व्यक्त झालें.

१४. गुणांच्या आश्रयहीनत्वानें भामिनीचें अनन्यसाधारण गुणवत्व सूचविलें. छेकानुप्रास.

१५. 'कनकाधिक कान्ति' यानें व्यतिरेक. दुसऱ्या चरणांत प्रतीप. पहिल्या अर्धांत हेतु कल्पून तिसऱ्या चरणानें उत्प्रेक्षा व्यक्त केली. छेकानुप्रास.

१६. चारी चरणांत चार उपमा आहेत. छेकानुप्रास.

१७. वृत्त्यनुप्रास. छेकानुप्रास. श्लेषालंकार. श्लेषानें देखील भामिनीविषयक परपुरुषगमन सुचविणें अगदीं अनुचित होय असें रा० परांजपे यांच्याप्रमाणें आह्मांसही वाटतें.

१८. पहिल्या दोन चरणांनीं पतिविषयक प्रेम अभिव्यक्त झालें.

१९. वाक्चातुरी वगैरे प्रस्तुत पदार्थांचा गायनरूप सामान्य-धर्मामध्यें एकेच कालीं अन्वय झाला ह्मणून तुल्ययोगिता. यमक. छेकानुप्रास.

## ( शान्तविलास. )

१. रूपक आणि उपमा. छेकानुप्रास. भयानक आणि शान्त हे रस. पृथ्वीवृत्त. ' अखिल इंदिरा ( आणि ) माधुरी जयांत सदा वसती असा हरिमुखेंदु तें ( मन ) चकोरापरी चिर पिवो ' असा अन्वय.

२. पहिल्या चरणांत रूपक; तिसऱ्यांत व्यतिरेक. छेकानुप्रास, वृत्त्यनुप्रासही. पृथ्वीवृत्त. करुण रस.

३. सामान्य घनमालेपेक्षां श्रीकृष्णरूप जी नीलघनावलि तिचा उत्कर्ष पहिल्या तीन चरणांत वर्णिला ह्मणून व्यतिरेक. छेकानुप्रास. पृथ्वी वृत्त. शांत रस.

४. ' लता ' शब्दानें गोपींचें, ' पथीं ' शब्दानें उत्तमाधम-योनिसंचरणाचें, आणि तमालानें भगवान् श्रीकृष्णाचें निगरण झाल्यामुळें सावयवातिशयोक्ति अलंकार झाला. छेकानुप्रास. वृत्त्य-नुप्रासही. पृथ्वी वृत्त. शान्त रस.

५. पापाचा अभाव हें कारण नसतां प्रसादरूप कार्य झालें ह्मणून विभावना. यानें परमेश्वराचें अत्यंत कारुणिकत्व सूचित

झालें. शेवटच्या चरणांत अनन्वयालंकार. करुण आणि शान्त रस. छेकानुप्रास. शार्दूलविक्रीडित.

६. शार्दूलविक्रीडित. छेकानुप्रास. करुण रस.

७. व्यतिरेकालंकारध्वनि. छेकानुप्रास. शार्दूलविक्रीडित.

८. एकच कृष्णाख्य वर्णद्वय विविधप्रकारें वर्णिलें ह्मणून उल्लेख. रूपकालंकार स्पष्टच आहे. छेकानुप्रास. शार्दूलविक्रीडित.

९. ' त्याशीं कधीं सख्य न करीं ' हा निषेध बाधित होऊन अर्थान्तरावर पर्यवसित झाला असल्यामुळें आक्षेपालंकार. ' बाल, ' ' तमालसुंदर, ' वृन्दावन, ' ' गोवृन्द, ' ' सौन्दर्यामृतनिष्यन्दि मन्दस्मितें, ' आणि ' सर्वभंगुरवस्तुविनाशकत्व ' यांनीं बालमूर्ति गोपवेषधारी घनश्याम श्रीकृष्णाचा आक्षेप होतो. छेकानुप्रास. शान्त रस. शार्दूलविक्रीडित.

१०. व्यतिरेक आणि परिकरांकुर अलंकार. करुण. मन्दाक्रांता वृत्त.

११. चातकाचा उपकर्ता मेघ आहे आणि नीलत्व, स्निग्धत्व, तापहारकत्व इत्यादि गुणांनीं मेघाचें श्रीकृष्णाशीं साम्य आहे त्यामुळें. मेघस्मरणानें तत्सदृश श्रीकृष्णाचें स्मरण होतें ह्मणून स्मरणालंकार. पूर्वार्धगत अर्थाला उत्तरार्धगत अर्थ हेतुभूत आहे ह्मणून काव्यलिंग. मन्दाक्रान्ता वृत्त. शांत रस. छेकानुप्रास..

१२. विष्णुप्राप्तिरूप इष्टार्थ स्वहृदयांत असतां तो कोठें आहे म्हणून पृच्छा करीत सुटणें हें इष्टार्थप्राप्तीला विपरीत असें आचरण झालें ह्मणून विषमालंकार. छेकानुप्रास. शान्त व अद्भुत रस. मन्दाक्रान्ता.

१३. इंदिरेशादिकांचेंच भजनादिक करावें अन्याचें करूं नये असा अर्थ तात्पर्यमर्यादेनें प्रतीत होतो म्हणून परिसंख्या; यमकालंकारही. मालिनी. शान्त रस.

१४. सावयवरूपकालंकार. शिखरिणी. छेकानुप्रास.

१५. मुक्तीसाठीं कर्मपाश तयार करणें हें इष्टार्थाच्या प्राप्तीला विपरीत आचरण झालें म्हणून विचित्रालंकार. ज्ञानानें मोक्ष संपादन करणें हा उत्तम मार्ग हें व्यंग्य. मंदाक्रांता. छेकानुप्रास. अद्भुत रस.

१६. विष्णु हें आधेय क्रमानें अनेकाधिकरणक झालें म्हणून पर्याय अलंकार. छेकानुप्रास. शान्त रस. गीति.

१७. निराश होऊं नको हें व्यंग्य. गीति.

१८. लक्ष्मी आपल्या अनेक विलोभनीय गुणांनीं प्रसिद्ध असून तिचा मादकत्व या दोषामुळें तिरस्कार कथन केला म्हणून तिरस्कार अलंकार. छेकानुप्रास. शान्त रस. शिखरिणी.

१९. ' जननी भागीरथी उभी जवळ' हा अर्थ मनांत येऊन वक्त्याला पूर्वार्धगत स्वोक्तीचें वैफल्य वाटलें म्हणून तो तिचा निषेध करून ' अथवा सुखें निजावें ' असें बोलला; यास्तव आक्षेपालंकार. जननीपदानें परमकारुणिकत्व व्यंजित झालें. भागीरथीशब्दानें परमपावित्र्य ध्वनित झालें. उभी यानें जागरूकत्व द्योतित झालें. जवळ एणेंकरून एका क्षणांत पुनीत होण्याचा संभव गम्यमान झाला. छेकानुप्रास. गीति.

२०. वक्त्याचें परमेश्वरविषयकरतिमूलक धैर्य व्यंजित झालें. यमक, छेकानुप्रास. गीति.

२१. मनाचा मुलगा तो मनोभव ( मदन ). त्याला शिवानें जाळून भस्म केलें. यास्तव मन हें त्याचा सूड घेण्याविषयीं

विचार करूं लागलें. परंतु त्याला कांहीं उपाय सुचेना. तेव्हां तें शिवपूजकांना त्रास देऊं लागलें. असा प्रतिपक्षसंबन्धिजनाचा तिरस्कार वर्णित झाला ह्मणून प्रत्यनीक अलंकार. ' रे रे ' या द्विरुक्तीनें अत्यंत तिरस्कार व्यंजित झाला. परमेश्वराकडे मनाची प्रेरणा करूं लागल्यास विषयान्तरासक्तीनें तें तिथें स्थिर होत नाहीं हा भाव. वसंततिलक.

२२. सादृश्यमूलक रामविषयक संशय वर्णिले म्हणून ससंदेहालंकार. पुष्पिताग्रावृत्त. छेकानुप्रास.

२३. वरचाच अलंकार. पण येथें तो निश्चयगर्भ आहे. वृत्त्यनुप्रास, छेकानुप्रास आणि यमक. हरिणीवृत्त.

२४. येथें ससंदेहालंकारच. परंतु तो निर्णयांत परिणत झाला आहे ह्मणून निश्चयान्त संदेह. छेकानुप्रास. शिखरिणी.

२५. नीचगृहादिक आणि लक्ष्म्यादिक यांचा अननुरूप संबंध वर्णन केला ह्मणून विषमालंकार. मी दीन कोणीकडे आणि तूं ईश्वर कोणीकडे असा अर्थ आक्षिप्त झाल्यामुळें विषमालंकारध्वनि. ईश्वराच्या विषमतेविषयीं असहिष्णुत्व हें व्यंग्य. शार्दूलविक्रीडित. धर्मवीर रस.

२६. अनन्यसाधारणकवित्व सूचित करणारा जो गर्व तन्मूलक वीररसाचा ध्वनि या पद्यांत आहे. छेकानुप्रास. शार्दूलविक्रीडित वृत्त.

२७. कवीन्द्राच्या वाणीपुढें वीणानाद फिका वाटूं लागला हा अर्थ प्रतीत झाल्यामुळें व्यतिरेकध्वनि. [illegible]. छेकानुप्रास. शिखरिणी.

२८. मात्सर्ययुक्तखलांनीं केलेल्या अवमानरूप दोषाला दोष समजूं नको असा अर्थ वर्णिला ह्मणून अवज्ञा अलंकार. तिसऱ्या चरणांत रूपक. शिवाय काव्यलिंगही. यमक. छेकानुप्रास. वसंततिलक. पाण्डित्यवीर.

२९. व्यतिरेकध्वनि. छेकानुप्रास आणि वृत्यनुप्रास. शिखरिणी. वीर रस.

३०. प्रथमचरणांत प्रतीपालंकार. शेवटच्यांत उपमा. वीर रस. शार्दूलविक्रीडित.

३१. प्रतीपालंकार. वृत्यनुप्रास. साकी.

३२. 'रुपा' शब्दानें लवंगी द्योतित झाली. 'विलासभवन' यानें तारुण्य घालविण्याचें अत्यंत अनुरूप स्थल प्रकटित झालें. नित्यविधिसंपादनामध्यें लोकाधिकत्व कसें येतें ही रा० परांजपे यांची शंका अस्थानीं नाहीं. वीर रस. छेकानुप्रास. शार्दूलविक्रीडित.

३३. रूपक. छेकानुप्रास. अनुष्टुभ्.

---

# परिशिष्ट तिसरें.

## ‘ जगन्नाथराय पंडित. ’

‘ हा कवि तैलंगण देशांत मुंगंडा म्हणून एक शहर आहे तेथील राहणारा असे. वेगीनाड कुळांतील रामचंद्र उपाध्याय नामक ब्राम्हणाचा हा मुलगा होय. तो अकबर बादशहाच्या वेळीं होता. जगन्नाथ हा बारा वर्षांचा होईपर्यंत त्याला संस्कृत भाषेचा एक शब्दही ठाऊक नव्हता. नंतर आपल्या मेहुण्याच्या घरीं राहून त्यानें काव्याभ्यास केला. रात्रंदिवस श्रम करून त्यानें गीर्वाण भाषेचें चांगलें ज्ञान संपादन केलें. तदनंतर न्याय, अलंकार, मीमांसा इ० शास्त्रें पढून तो मोठा बुद्धिमान् कवि झाला. नंतर तो कर्नाटक देशाच्या राजाच्या भेटीस गेला, परंतु तेथें त्याच्या इच्छेप्रमाणें गुणांची चहा न झाल्यामुळें जो अपमान झाला तदनंतर कांहीं श्लोक रचावे म्हणजे त्याचें लक्ष लागेल म्हणून त्यानें कांहीं श्लोक रचले. अशी युक्ति केली, तथापि त्याच्या श्रमाकडे कोणी लक्ष दिलें नाहीं. त्यानंतर जगन्नाथपंडित तेथून निघून जयपुरास गेला आणि तेथें बहुत वर्षें राहून अनेक प्रकारच्या शास्त्रविषयांमध्यें पंडितांस त्यानें जिंकलें आणि तेथें मोठी शाळा घालून शेंकडों विद्यार्थ्यांस शास्त्रें पुराणें इत्यादि पढविलीं. ’

‘ दिल्लीस बादशहाच्या पदरीं एक महान् विद्वान् काजी होता. त्यानें आपल्या विद्येच्या बळानें ‘ यवन धर्म खरा ’ असें स्थापण्याच्या उद्देशानें देशोदेशीं जाऊन कित्येक पंडितांस कुंठित केलें; तेव्हां त्यास मोठी चिंता पडली. जगन्नाथपंडितानें सांगितलें कीं, एक वर्षाची मुदत द्याल तर मी त्या काजीचा

पराभव करीन. नंतर त्यानें त्याच काजीजवळ जाऊन यवन-धर्मांतले सगळे ग्रंथ पाहिले; आणि त्या शास्त्रांचें त्यास मार्मिक ज्ञान झालें. तेव्हां कोटिक्रमानें त्या काजीशीं धर्मविषयक वाद करून त्यास कुंठित केलें आणि स्थापिलें कीं, यवनांचा धर्म तो यवनांनींच आचरावा, दुसऱ्यास अधिकार नाहीं. तेणें-करून बादशाहाची मर्जी फार प्रसन्न झाली आणि त्यानें पंडिताला आपले पदरीं बाळगिलें. फारशी भाषा शिकल्यानंतर मनोरंजनार्थ पंडितांनीं संस्कृत श्लोक, फारशी शायरी असे मिश्रभाषात्मक कित्येक रचिले. बादशाहाच्या दरबारीं जगन्नाथ-रायपंडितापेक्षां कोणी वरिष्ठ नव्हता. पुढें त्याची विद्याकीर्ति सर्वत्र पसरली.'

'जगन्नाथरायपंडित स्वरूपानें फार सुंदर देखणा पुरुष होता; आणि विषयासक्त फार असे. ही गोष्ट राजकन्येच्या कानावर गेली. आणि तिला त्याच्या बुद्धीचा व सौंदर्याचा अभिनव चमत्कार वाटून ती आपल्या महालांत बसून जाळीच्या पडद्यां-तून वारंवार त्याच्याकडे पहात असे. त्या कन्येचें वय सोळा वर्षांचें झालें असतां जगन्नाथपंडिताबरोबर लग्न करावें असा तिनें निश्चय करून आपलें मनोगत आईला सांगितलें. या नामांकित राजकन्येचें नांव लवंगी. ती फारच रूपवती आणि गुणवती होती.'

'एके दिवशीं जगन्नाथरायपंडित बादशाहाबरोबर बुद्धिबळें खेळत असतां बादशाहाला तहान लागली; तेव्हां राजकन्या लवंगी सुवर्णकलश डोक्यावर घेऊन राजाकडे आली. राजा पाणी प्याल्यानंतर ती आली तशी मस्तकावर सुवर्णकलश घेऊन परत जाऊं लागली, तेव्हां राजानें पंडितास म्हटलें कीं, तुम्ही

कवि आहांत, या कन्येवर श्लोक करावा. पंडितानें तावडतोब असा श्लोक रचला:—

'इयं सुस्तनी मस्तकन्यस्तकुंभां
कुसुंभारुणं चारु चेलं दधाना ।
समस्तस्य लोकस्य चेतःप्रवृत्तिं
गृहीत्वा घटे स्थाप्य यातीव भाति ! ॥'

'बादशाहानें तो श्लोक ऐकतांच एवढ्या थोड्या वेळांत श्लोक केला ह्मणून त्याची मर्जी फारच प्रसन्न झाली. तेव्हां पंडिताला सांगितलें, कीं तुझ्या इच्छेस येईल तें माग. तेव्हां पंडित बोलले:—

'न याचे गजालिं न वा वाजिराजिं
न वित्तेषु चित्तं मदीयं कदाचित् ।
इयं सुस्तनी मस्तकन्यस्तकुंभा
लवंगी कुरंगीदृगंगीकरोतु ॥'

'हें मागणें ऐकतांच बादशाहा अंतःकरणांत खिन्न झाला. परंतु वचन गेलें त्यामुळें कुंठित झाला. नंतर पंडितास म्हणाला तूं आमच्याबरोबर खाना खाशील तर आम्ही तुला आपली मुलगी देऊं. पंडितांनीं ती गोष्ट कबूल केली; आणि आपलें ब्राम्हण्य नष्ट झालें तरी चिंता नाहीं परंतु राजकन्या प्राप्त होवो असा निश्चय केला.'

'जरी राणीच्या मनांत आपल्या कन्येचें त्याच्याशीं लग्न लावूं नये असें आलें तरी तिची इच्छा पूर्ण केली तरच ती जगणार, अन्यथा प्राणत्याग करील असें पाहून तिनें एके दिवशीं राजाची प्रसन्न मर्जी पाहून त्याजजवळ ही गोष्ट काढण्याचा विचार केला.

तों इतक्यांत राजानेंच येऊन राणीला तें वृत्त कळविलें. नंतर बादशहानें त्या दोघांचें लग्न मोठ्या समारंभानें लाविलें; आणि त्यानंतर लोकांनीं जगन्नाथपंडिताला जातीबाहेर टाकिलें, तरी राजाश्रयामुळें तीं उभयतां सुखानें नांदलीं. या गोष्टीला बहुत वर्षे लोटल्यानंतर पंडितराय हे वैराग्य पावून त्या यवनीसहवर्तमान काशीस जाऊन राहिले.'

''एके दिवशीं जगन्नाथपंडित यवनीसहवर्तमान भागीरथीच्या कांठीं निजले होते; तों प्रहर दिवस आला तरी जागृत झाले नाहींत. त्या वेळेस त्या मार्गानें अप्पया दीक्षित जात होते. त्यांनीं पाहून ह्मटलें, असल्या प्रसिद्ध ठिकाणीं कोण चाण्डाल यवनीला घेऊन निजला आहे? जवळ जाऊन पाहतात तों त्याच्या डोकीचे केंस पिकले होते. तेव्हां दीक्षितांनीं अर्ध श्लोक ह्मटला:—

'किं निःशंकं शेपे शेषे वयसि त्वमागतो मृत्युः'।

'तेव्हां जगन्नाथपंडितानें तोंडावरचें पांघरूण काढिलें असतां दीक्षितांनीं त्यास ह्मटलें कीं,—

'अथवा सुखं शयीथा निकटे जागर्ति जान्हवी भवतः'॥

'जगन्नाथपंडित काशीस जाऊन राहिले तेव्हां त्यांना शुद्ध करून घेण्याविषयीं तेथील विद्वानांच्या मनांत होतें. परंतु पंडितांचें ह्मणणें असें होतें कीं माझ्या यवनीसुद्धां मला शुद्ध करून घ्याल तर मी प्रायश्चित्त घेईन; परंतु ती गोष्ट घडावयाची नाहीं ह्मणून तो विचार तसाच राहिला. पंडितरायानें अंतर्यामीं पश्चात्ताप पावून भागीरथीवर पूर्ण भाव ठेविला होता, ही गोष्ट पुढें सर्व लोकांच्या प्रत्ययास आली. शके १५०० मध्यें एके दिवशीं

पंडितराय यवनीसहवर्तमान घाटावर बसले आणि गंगेची स्तुति आरंभिली; तेव्हां दर श्लोकास गंगेचें पाणी एकेक पायरी चढूं लागलें. अशा बावन्न श्लोकांस बावन्न पायऱ्या पाणी चढलें. त्या वेळेस तो चमत्कार पाहण्यासाठीं काशींतले आबालवृद्ध सर्व लोक आले असतां त्यांदेखतां गंगेनें त्यांस दर्शन देऊन यवनीसहवर्तमान त्यांचा उद्धार केला ही गोष्ट जगविश्रुत आहे.'

'कविचरित्र.'

---

ज्याचा तात असे गणेश सुकृती, माता यशोदा सती ।
लेले हें कुल, नाम लक्ष्मण, जनस्थानीं जयाची स्थिति ॥
त्यानें पद्यमयी नवीन रचिली भामाविलासावरी ।
छाया प्राकृत; तीस सुज्ञ रसिकें सप्रेम घ्यावें करीं ॥ १ ॥



## विक्रीस तयार.

## कै. ती. गणेशशास्त्रीलेलेकृत कांहीं ग्रंथ.

१. **अमरुशतक**—मराठी पद्यात्मक भाषान्तर; किं. ०६.

२. **शिवाजीचरित्र**—दक्षिणाप्राइज कमिटीनें पहिल्या प्रतीचें बक्षिस दिलेलें मराठी काव्य; किं. एक रुपया.

३. **तीर्थयात्राप्रबंध**—मराठी गद्य ग्रंथ. हा कै० श्री० अण्णासाहेब विंचूरकर यांच्या उदार आश्रयानें प्रसिद्ध झाला असून यांत उत्तर व दक्षिण हिंदुस्थानांतील सर्व प्रमुख तीर्थें व क्षेत्रें यांचें प्राचीन व अर्वाचीन वर्णन आहे. शिवाय प्रत्येक क्षेत्रीं कर्तव्य जो विधि त्याचेंही यांत संक्षेपानें निरूपण केलें आहे. भाविक हिंदु गृहस्थांनीं हा ग्रंथ संग्रहाला ठेवण्यासारखा असून प्रत्येक हिंदु गृहस्थानें एकदां तरी वाचण्यासारखा आहे. किं. एक रुपया.

## स्वकृत ग्रंथ.

१. **मेघदूताचें समवृत्त मराठी भाषांतर** डे० व्ह० ट्रा० सोसायटीनें बक्षिस दिलेलें. किं. ०६ आणे.

२. **पद्यमंजरी** विविध विषयांवर मराठी कविता. डे० व्ह० ट्रा० सोसायटीनें बक्षिस दिलेलें पुस्तक. किं. ०८ आणे.

३. **महाराष्ट्र भामिनीविलास**—जगन्नाथपंडितकृतभामिनीविलासाचें मराठी पद्यात्मक भाषांतर किं. ०१२

ट. हं. निराळें पडेल. सदरील पुस्तकें मिळण्याचा पत्ताः—

**लक्ष्मण गणेशशास्त्री लेले,**
सदाशिव पेठ, घ. नं. ७८२ पुणें.